# पिंपळपान

गोविंदाग्रजांची कविता केशवसुतांच्या सच्चा चेल्याची कविता आहे. एका अंगाने ती, जुन्या जाचक रूढी, धर्माच्या मृत सीमा, पोकळ गताभिमान यांचे सीमोल्लंघन करू पाहणाऱ्या नव्या मनूच्या तरुण भावनांचा उत्साही आविष्कार आहे; तर दुसऱ्या अंगाने गूढ, रोमँटिक प्रेमाची कवने गाणाऱ्या प्रतिभाशाली शाहिराची कविता आहे. मानवी जीवनातील सुखदु:खे, आणि त्यांना वेढणारा विश्वाचा पसारा या सांगडीतील रहस्यांचा भेद करू पाहणाऱ्या बुद्धिमान चिंतकाच्या मनातील सखोल खळबळ आहे. उत्कटता, नावीन्य, प्रतिभेची उत्तुंगता, आणि अनुभवांचा अस्सलपणा यांच्या जोरावर, आवडीनिवडीच्या अनेक उलथापालथी झाल्या तरी मराठी काव्य-रसिकांच्या मनातील मानाचे स्थान अजून आहे तसेच टिकवून आहे.

गोविंदाग्रजांची निवडक कविता

# पिंपळपान

संपादक : कुसुमाग्रज
प्रस्तावना : रा. शं. वाळिंबे

कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे




प्रकाशक : अनंत अंबादास कुलकर्णी
कॉन्टिनेन्टल प्रकाशन, टिळक रोड, पुणे ३०

मुद्रक : चिं. स. लाटकर, ' शिव-पार्वती '
कल्पना मुद्रणालय, ४६१।४ सदाशिव, पुणे ३०

मुखपृष्ठ : पद्मा सहस्रबुद्धे, मुंबई

प्रकाशन क्रमांक : ५५५
प्रथमावृत्ती : १९७०

किंमत पाच रुपये

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

'अल्लड प्रेमास' ही कविता गडकऱ्यांनी १९०९ साली लिहिली असली, आणि यापूर्वी त्यांच्या चारपाच कविता प्रसिद्ध झालेल्या असल्या तरी त्यांचा काव्यसंसार खऱ्या अर्थाने १९११ च्या आरंभी सुरू झाला असे म्हणावयास हरकत नाही. कै. त्र्यं. सी. (अण्णासाहेब) कारखानीस आणि कवी 'भालचंद्र' (श्री. ग. ना. टिपणीस) यांच्या सहकार्याने 'तुतारी' या नावाचे एक मासिक केशवसुतांच्या स्मरणार्थ काढण्याचा गडकऱ्यांनी १९११ च्या सुरुवातीस संकल्प केला होता. या मासिकासाठी सामग्री जमविण्याच्या उद्देशाने या तिघांनी १९ फेब्रुवारी १९११ रोजी काव्यचर्चेला वाहिलेल्या एका मंडळाची स्थापना केली. 'तुतारी मंडळ' हेच या कविमंडळाचे नाव होते. मनातील उच्च, स्वतंत्र. व निर्भय विचार प्रगट करण्याचे एक साधन म्हणून मासिक काढावे असा या कवींचा विचार होता. केशवसुत हे त्यांचे मार्गदर्शक. केशवसुतांची 'तुतारी' सदैव फुंकती राखण्याकरिता 'तुतारी मंडळा'ची स्थापना झाली होती. मंडळाच्या स्थापनेच्या दिवशी गडकऱ्यांनी 'केशवसुत मेले ?' ही आपली कविता वाचून दाखविली. गडकऱ्यानी आपल्या काव्यसंसाराला खरी सुरुवात केशवसुतांच्या स्तवनाने केली ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. १९१० मध्ये 'प्रेमसंन्यास' नाटक लिहीत असता गडकऱ्याच्या मनावर आगरकरांच्या सुधारणावादी विचारसरणीचा फार मोठा प्रभाव होता. यामुळेच त्यांना केशवसुतांच्या 'तुतारी'चे इतके आकर्षण वाटत असले पाहिजे. 'प्रेमसंन्यास' नाटकातील जयंताच्या तोंडचे सुधारणावादी विचार जसेच्या तसे 'स्मशानातले गाणे' या कवितेत आले आहेत. 'दसरा' ही कविता गडकऱ्यांनी

१९१३ ऑक्टोबरमध्ये लिहिली. या कवितेच्या शेवटी "केशवपुत्राचा महशूर 'गोविंदाग्रज' चेला सच्चा" असा त्यांनी स्वतःचा उल्लेख केला आहे. गडकऱ्यांच्या मनावर केशवसुतांच्या 'तुतारी'चा किती मोठा प्रभाव होता याचे प्रत्यंतर 'दसरा' या कवितेत दिसून येईल. समाजातील अनेक विचित्र विसंगती, दुष्ट रूढींचे घोर परिणाम, खोट्या धर्मकल्पना आणि नीतिकल्पना, ठराविक चाकोरीत राहण्याची समाजाची वृत्ती इत्यादी गोष्टींवर कठोर टीका करण्यासाठीच गडकऱ्यांनी 'स्मशानातले गाणे' आणि 'घुबडास' या कविता थेट 'तुतारीच्या' वळणावर लिहिल्या.

गडकऱ्यांच्या काव्यसंसाराची सुरुवात अशा प्रकारे 'तुतारी'च्या अनुकरणाने झाली हे खरे असले तरी १९१२ ते १९१४ या तीन वर्षांच्या काळात स्वैर कल्पनाविलासाने नटलेल्या काही कविता त्यांनी लिहिल्या. 'राजहंस माझा निजला' (जुलै १९१२) 'प्रेमपाठ' (सप्टेंबर १९१२), 'चिमुकलीच कविता' (सप्टेंबर १९१३), 'अरुण' (सप्टेंबर १९१४) या त्या कविता होत. 'प्रेमसंन्यासा'तील स्वैर कल्पनाविलासाचा आणि अलंकारप्रचुर शैलीचा फार मोठा प्रभाव या काळात गडकऱ्यांच्या मनावर होता. अशा प्रकारच्या शैलीचे उत्कृष्ट उदाहरण 'राजहंस माझा निजला' ही कविता होय. या कवितेचा भर परंपरित रूपकांवर आहे. पहिल्या कडव्यापासूनच कवीने रूपकांची पखरण केली आहे. पण सुरुवातीची रूपके आशयाशी एकजीव झाली असल्यामुळे आकर्षक झाली आहेत. यानंतर मात्र 'राजहंस' या शब्दाशी निगडित असलेल्या अनेक सहचारी कल्पना परंपरित रूपकांमधून व्यक्त झाल्या आहेत. आपला आशय परिणामकारक रीतीने विशद करण्यापुरताच रूपकांचा उपयोग करून घ्यावा आणि मग त्यांचा मोह सोडून द्यावा हे तारतम्य कवीला उमजले नाही. राजहंस मानस सरोवरात असतो; 'मानस' या शब्दाचा मन हाही अर्थ आहे; मानस (म्हणजे मन) हेच कोणी मानस सरोवर हे रूपक स्फुरताच प्रेमरूपी जल, त्या जलाच्या लाटांवर पोहणारा राजहंस, मोत्यांचा चारा, शिंपा, त्या शिंपांमधील अश्रू हेच कोणी मोती—इत्यादी रूपकांची वृष्टी झाली. पण एवढ्याने कवीचे समाधान झाले नाही. मौक्तिकसुमणि ही कल्पना स्फुरताच अश्रूंची माळ ही दुसरी कल्पना स्फुरली. या अश्रुमालेची वैजयंती माळेशी सांगड घातली गेली. वैजयंतीमुळे वैकुंठेश्वर विष्णूची कल्पना सुचली. यामधूनच वैजयंतीमधील कौस्तुभ रत्नाची कल्पना, आणि त्या कौस्तुभ रत्नाच्या कोंदणाची कल्पना इत्यादींचा उदय झाला. राजहंस हा अश्रुरूपी वैजयंती माळेतील कौस्तुभ ठरला आणि मातेचे हृदय हे त्या कौस्तुभाचे कोंदण ठरले. रूपकांची स्वैर पखरण या कवितेत झाली असल्यामुळे तिच्यात हळुवार भावनांच्या आविष्करणाला स्वाभाविकच पायबंद बसला आहे. तरी सुद्धा चार ते सात या कडव्यांमध्ये परंपरित

रूपकांचा मोह कवीने टाळल्यामुळे त्यांच्यातील भावनाविष्कार परिणामकारक झाला आहे.

या कवितेनंतर चारच महिन्यांनी 'प्रेमपाठ' ही कविता प्रसिद्ध झाली. याही कवितेत रूपकांची आणि स्वैर कल्पनाविलासाची विपुलता आहे. 'बालकवीं'च्या काही प्रसिद्ध निसर्गगीतांमधील कल्पनाविलासाची जात आणि 'प्रेमपाठ' या कवितेतील कल्पनाविलासाची जात जवळजवळ एकच आहे. 'त्रिमुकलीच कविता' (सप्टेंबर १९१३) या कवितेत काही सुंदर उत्प्रेक्षा आहेत. 'अरुण' ही कविता 'बालकवीं'च्या 'अरुण' या प्रसिद्ध कवितेचे अनुकरण करून लिहिलेली आहे, हे स्वतः गडकऱ्यांनीच कबूल केले आहे. खरे म्हणजे हे अनुकरण अगदी नीरस झाले आहे. 'बालकवीं'च्या धाटणीवर 'अरुण' याच नावाची आणखी एक कविता (या कवितेचा लेखनकाल उपलब्ध नाही.) गडकऱ्यांनी लिहिली आहे. या कवितेमध्ये भीषण प्रतिमानांचा अतिरेक झाला आहे. 'प्रेमपाठ' या कवितेतील कल्पनाविलासाची जात अगदी थेट बालकवींच्या कल्पनाविलासाची आहे असे जे वर म्हटले आहे त्याचा प्रत्यय पुढील ओळींवरून येईल.

आकाशाच्या लग्नमंडपीं लता करवल्या या
वृक्षबालकां लाजुनि पल्लव सांवरितां दमल्या !
कळ्या कोवळ्या, हलती कानीं डूल मजेदार,
उषा-वधूवरि सुमाक्षतांही कारिती भडिमार.
नवरदेव नाचरा निघाला, ती पाठोपाठ—
लाजुनि झाली उषा दूर, कुणि द्या पदरा गांठ.

'बालकवीं'च्या धाटणीवर लिहिलेल्या पुढील ओळी पाहाव्या—

हृदयपटावरि निज लज्जेचा लाल रंग उधळा
प्रेमपल्लवीं लिहुनी कुंकुमपत्रें द्या सकलां.
प्रीतिदेविचें आज निघालें लग्न निसर्गाशीं,
वऱ्हाड जमलें, मुहूर्त भरला, धीर न कोणाशीं.
वनदेवींच्या मुलिंनो ! या ग, या लौकर म्हणुनी,
पराग उधळित, सुवास पसरित, कोमल हातांनीं !
हिमवंतीच्या जलीं मिसळुनी मरंदमय तेला,
स्नान सुमंगल घाला कोणी प्रीतिदेवतेला !

शशिकिरणांचे ततु भिजवुना संध्यारंगांनीं
अष्टपुत्रि द्या नव नवरीला कुणी तरी विणुनी.
हिमगिरिशिखरीं स्फटिक शिलांतरिं रविकिरणें शिरती,
प्रतिकिरणें पाझरती भरभर अतिकोमल असती.
मुग्ध अधरिंच्या गुलाबि रंगीं रंगवुनी त्यांना
त्या सूत्रांची काचोळी कुणि नवरीला द्या ना.

एकंदरीत वरील ओळींतील कल्पनाविलासामुळे 'बालकवीं'च्या कल्पनाविलासाची आठवण होणे अपरिहार्य असले तरी काही कल्पनांत दिसून येणारा गडकऱ्यांच्या प्रतिभेचा उन्मेप विचारात घेण्यासारखा आहे. चंद्रकिरणांचे तंतू संध्येच्या रंगांनी रंगवून त्यांची नववधूसाठी अष्टपुत्री करण्याची कल्पना, किंवा हिमालयातील स्फटिकाच्या शिलांमध्ये प्रवेश केल्याबरोबर पाझरणाऱ्या नाजूक सूर्यकिरणांच्या तंतूंना अधरोष्ठाच्या गुलाबी रंगाने रंगवून त्या तंतूंची नवरीसाठी काचोळी करण्याची कल्पना — हा गडकऱ्यांच्या तरल कल्पनाशक्तीचा मोठा मनोरम आविष्कार आहे.

केवळ स्वैर कल्पनाविलासालाच वाहिलेल्या गडकऱ्यांच्या कवितांची संख्या अगदीच बेताची आहे. आणि या थोड्या कविताही १९१२ ते १९१४ या तीन वर्षांच्या काळातील आहेत.

'मुरली' ही गाजलेली कविता १९१२ च्या सप्टेंबरमध्ये प्रसिद्ध झाली. या कवितेत प्रीती व भक्ती यांचा संगम कवीला दाखवावयाचा आहे. किंबहुना, प्रीतीच्या उत्कटतेतूनच भक्तीचा उदय होत असतो असे कवीला म्हणावयाचे आहे. मानवी जीवनात प्रेमसाफल्याचे अपार महत्त्व असून प्रिय व्यक्तीकडून वेळीच प्रत्युत्तर मिळाले नाही तर जीवन विफल होते, असेच या कवितेला जोडलेल्या प्रास्ताविक टीपेतून गडकऱ्यांना सुचवावयाचे आहे. ही सारीच कविता रूपकात्मक आहे. राधिका म्हणजे भक्त, आणि मुरली म्हणजे परमेश्वरी कृपेचे प्रत्युत्तर हे स्वतः गडकऱ्यांनीच स्पष्ट केले आहे. यामध्ये आणखी एका व्यंजनेचा अंतर्भाव आहे. राधिका म्हणजे प्रियकराची अथवा प्रेयसीची तन्मयता, आणि मुरली हे त्या तन्मयतेला मिळालेले प्रत्युत्तर. या कवितेच्या काही कडव्यांमध्ये उत्कट प्रेमभावनेच्या विविध अवस्थांचे आविष्करण झाले आहे. प्रेमभावनेतील उत्कटता परिसीमेला गेली म्हणजे विवेकाला तेथे मुळीच थारा मिळत नाही; या तन्मयतेला तर्काच्या व विवेकाच्या कसोट्या लावता येत नाहीत; या ठिकाणी भावनाच सर्वस्वी प्रमाण होत, असेच भावपूर्ण हृदयाच्या प्रतीतीच्या उल्लेखाच्या द्वारे गडकऱ्यांना सुचवावयाचे आहे. ही व्यंजना लक्षात ठेवून सदर कविता

वाचली असता प्रेमातील उत्कटतेमुळे उत्पन्न होणारा बेभानपणा, प्रिय व्यक्तीच्या मीलनाची अनिवार उत्कंठा, तिच्याशी पूर्ण तादात्म्य पावण्याची लालसा, या तादात्म्यातून होणारी उन्मनी अवस्था, या अवस्थेत प्राप्त होणारा उत्कट आनंद, इत्यादी अवस्थांची प्रतीती आल्यावाचून राहणार नाही. परमेश्वराच्या भक्तीमध्ये अंतर्भूत झालेल्या अवस्था, आणि उत्कट प्रेमभावनेच्या अवस्था, यांची जात एकच असते असे तर गडकऱ्यांना सुचवावयाचे नसेल ना? भक्ती ही प्रीतीचीच पुढची पायरी असते. उत्कट प्रीतीच्या प्रकर्षाचेच भक्तीत पर्यवसान होत असते, प्रीतीची किंवा भक्तीची शेवटची पायरी म्हणजेच आत्यंतिक तादात्म्य—स्वत्वाची पूर्ण विस्मृती, याच कल्पनांचा आविष्कार करण्यासाठी गडकऱ्यांनी 'मुरली' ही कविता लिहिली आहे.

*

१९१२ ऑगस्टमध्ये 'वेडा' ही कविता प्रसिद्ध झाली. "कुणाला कशाचें वेड लागेल आणि त्याचा शेवट कशात होईल, हे कोणी सांगावे?" अशी प्रास्ताविक टीप खुद्द गडकऱ्यांनीच लिहिली आहे. भावनावश मनाच्या अव्यवहारी वेड्या आशेचे, अलभ्य गोष्टीचा लाभ करून घेण्याच्या विचित्र हव्यासाचे, उत्कृष्ट आविष्करण या कवितेत झाले आहे. अशीच आणखी एक कविता यानंतर दोन वर्षांनी (नोव्हेंबर १९१४) प्रसिद्ध झाली. 'ओसाड आडातील एकच फूल' हे या कवितेचे नाव. आपल्या चित्तात प्रिय व्यक्तीविषयी ज्या भावना जागृत झाल्या आहेत, तशाच भावना त्या व्यक्तीच्या चित्तातही जागृत झाल्या असल्या पाहिजेत अशी गोड कल्पना करून घेऊन त्या कल्पनेच्या धुंदीत गुंग होऊन राहण्याची भावनाप्रधान माणसाची जी वृत्ती असते, तिचे मोठे हृद्य चित्रण या कवितेत केले आहे. मानसशास्त्रात ज्याला 'प्रॉजेक्शन' म्हणतात तो प्रकार येथे झाला आहे. आपल्या मनातील भावनांचा दुसऱ्यावर आरोप करणे, आपल्या कल्पनासृष्टीतील चित्रे सत्य सृष्टीत साकार झाली आहेत असा आभास निर्माण करून घेणे, आणि त्या आभासात सुख मानणे, असे या प्रकाराचे वर्णन करता येईल. आत्यंतिक वृत्तीच्या भावनावश माणसाच्या मनातील आर्त भावना, उत्कंठा, वेड्या आशा, आणि अमर्याद इच्छा, यांचेच आविष्करण ओसाड आडातील फुलाच्या द्वारे गडकऱ्यांनी केले आहे.

'फुलें वेंचिलीं पण—' ही कविता (जानेवारी १९१४) म्हणजे निष्प्रेम मनाचे केविलवाणे गाणे होय. मोहक रानफुलांचे झेले खुडून घ्यावेत, त्यांच्या मुसमुसणाऱ्या सौन्दर्याने आणि मधुर सुगंधाने मन भारून जावे—पण ही फुले जिला द्यावयाची ती प्रेयसी कोठे आहे? या विचाराने व्याकुळ झालेल्या प्रेमविव्हल व्यक्तीच्या

अंतर्मनाचे आविष्करण या कवितेत आढळेल. ही कविता लिहिल्यानंतर लगेच गडकऱ्यांनी ' दिव्य प्रेमाची जाति ' ही कविता लिहिली ( फेब्रुवारी १९१४ ). स्त्री-पुरुषांमधील शुद्ध, निष्पाप प्रेमाची जी कल्पना गडकऱ्यांनी १९११ साली ' प्रेमसंन्यास ' नाटकात मांडलेली होती, तीच कल्पना अतिशय प्रभावी रीतीने प्रस्तुत कवितेत प्रकट झाली आहे. दिव्य प्रेमाची जात लोकविलक्षण असून सामान्य व्यावहारिक प्रेमापेक्षा ती अगदी वेगळी असते. या दिव्य प्रेमाला स्थलकालांची मर्यादा नसते, किंवा शक्या-शक्यतेची आडकाठी नसते. अनंत योजने दूर असलेल्या आकाशात चमकणाऱ्या तारकेवर प्रेम करणे, तिच्या प्राप्तीची कसलीही आशा नसता तिच्या ठिकाणी साऱ्या चित्तवृत्ती केंद्रित करणे, ही खरी दिव्य प्रीती ! यातून निरभिलाष प्रेमाच्या कल्पनेचा विस्तार गडकऱ्यांनी केला आहे. आकाशातील तारकेवर प्रेम करणे म्हणजे जे दुष्प्राप्य आहे त्यावर प्रेम करणे. व्यावहारिक जगतातील लौकिक प्रेमाला प्रेमविषय झालेल्या व्यक्तीकडून प्रत्युत्तराची अपेक्षा असते. परंतु जे कसलीही अपेक्षा करीत नाही ते दिव्य प्रेम होय. दिव्य सौंदर्याच्या अवलोकनाने उद्भवणाऱ्या दिव्य प्रेमाला कसलीही आशा नसते, त्याला मोबदल्याची अपेक्षा नसते, ' निरभिलाष तन्मयता ' याच शब्दांनी त्याचे वर्णन करावे लागेल. असे हे उदात्त प्रेमाचे तत्त्वज्ञान या कवितेत आविष्कृत झाले आहे. " उच्चपदी विराजणाऱ्या सौंदर्याबद्दल दुर्लभतेमुळे अभिलाषबुद्धीऐवजी आदरभाव उत्पन्न होतो...... दिव्य सौंदर्याच्या सान्निध्याने मनोवृत्ती निवळतील की गढूळ होतील ? " या ' पुण्यप्रभाव ' नाटकातील ईश्वराच्या उद्गारातील ( अंक १, प्र. १ ) आशय ' दिव्य प्रेमाची जाति ' या कवितेत आलेला आहे.

' जिच्या जिवाला, तिळ मोबदला, नकोच कसला, निराश जन्मापासुनि ती '— असे दिव्य प्रीतीचे स्तवन करणारी कविता लिहिल्यानंतर सहा महिन्यांच्या आतच ( ऑगस्ट १९१४ ) ' ती कोण ? ' हे अप्रतिम सुनीत प्रसिद्ध झाले. आशा अविनाशी आहे, अमर्याद आहे हाच विचार अतिशय उत्कटतेने या सुनीतात आविष्कृत झाला आहे. जिच्यावर प्रेमाची वृष्टी करता येईल अशी कोणी तरी व्यक्ती जगात असली, आणि तिच्या ठायी वृत्ती तन्मय झाली, तरच मानवी जीवन कृतार्थ झाले असे म्हणता येईल. साफल्याच्या आशेतच जीवितसर्वस्व सामावले आहे. ती आशा जोपर्यंत चित्तात काहूर करीत नाही तोपर्यंत जीवनाला फुलोरा आला असे म्हणता येणार नाही. आपल्या भावना कोठे तरी केंद्रित करण्याची, आणि ती व्यक्ती कधी तरी भेटेल या आशेने तळमळण्याची लालसा मानवी मनाला नेहमीच सुख देत असते—हा उत्कटतेने ओतप्रोत भरलेल्या या कवितेचा आशय आहे. सागराची कधी तरी भेट होईल या आशेने सरिता रानोमाळ धावत असते. या आशेवरच सारे जग चालले आहे.

जीवाचें जगणें असेंच असतें सापेक्ष प्रेमावरी !
डोळेभेट दुरून, भाव अथवा आशाहि त्याला पुरे !

एकाकी व प्रणयशून्य जीवनाचा ओसाडपणा जाणवू लागला म्हणजे कसल्या तरी अनिर्वचनीय आशेची लहर मनात तरळू लागते, आणि जीव बेभानपणात विरून जातो.

ओठांशी भिडतें रहस्य मनिंचें—सांगूं कुणाला परी ?
अश्रू हे नयनींहि—माळ करुनी घालूं कुणाच्या गळां ?
आलें हें भरुनी रितें हृदयही—देऊं कुणाच्या करीं ?
आला दाटुनि कंठ—हाय ! रडुनी कोठें करूं मोकळा ?

या ओळींमधील आर्तता विलक्षण आहे. प्रत्येक भावनावश माणसाच्या उत्कट आशांचे प्रतिबिंब त्यांच्यात पडले आहे. या भावनेतील धुंदीची उत्कटता या सुनीताच्या शेवटच्या दोन ओळींत प्रकट झाली आहे.

जी माझ्यास्तव, मी जिचें सकलही, आधार जी जीवनी
देवा ! भेटवि—दाखवी तरि मला ती कोण देवी जनीं ?

अगदी रसरसलेल्या भावनांचा इतका उत्कट आणि मनाला भारून टाकणारा हा आविष्कार मराठी भावगीतांमध्ये अभूतपूर्व असाच आहे. आत्यंतिक उत्कटतेमुळेच या सुनीताला अलौकिक सौंदर्य प्राप्त झाले आहे.

प्रेमाच्या सफलतेसाठी आसुसलेल्या, आणि त्याविना अहर्निश तळमळणाऱ्या जीवाच्या आर्त व्यथा 'ती कोण ?' 'फुले वेचिली पण—', 'ओसाड आडातील एकच फूल', 'पुनर्विकसन' आणि 'हालत्या पिंपळपानास' या १९१४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या साऱ्याच कवितांमध्ये प्रकट झाल्या आहेत. 'चिरनिराश' व 'जीवन्मृत' मानस उमलणार तरी कधी ?—असा प्रश्न कवीने 'पुनर्विकसन' या कवितेत विचारला आहे (डिसेंबर १९१४). 'हालत्या पिंपळपानास' (डिसेंबर १९१४) या कवितेतील पुढील ओळी उल्लेखनीय आहेत :

नवबालाहृदयीं प्रीति नवी हलतांना
तच्छिरीं हलसि तूं तसाच पिंपळपाना !
जीं हृदयकंपनें सारीं मानसीं,
तीं आम्हांतें बाहेरी दाविशी !
निर्दोष मनानें भारी हालसी,

कुणि बाला जरि मज देइल असला मान,
तरि सुखेंच होइन मीही पिंपळपान !

*

'पानपतचा फटका' 'कृष्णाकांठीं कुंडल' यांच्यासारख्या दीर्घ कविता, किंवा 'फुटकी तपेली' 'कलगीचें गाणें' यांच्यासारख्या गूढवादी कविता सोडून दिल्या तर १९१५ पासून १९१८ पर्यंत गडकऱ्यांनी ज्या महत्त्वाच्या कविता लिहिल्या त्या कवितांमधून एक तर नैराश्याची व औदासीन्याची भावना पुन्हा पुन्हा प्रकट झाली आहे, किंवा प्रेमभंगाच्या दारुण व्यथा तरी प्रकट झाल्या आहेत. काही कवितांमध्ये औदासीन्याच्या अतिरेकाचे भीषणतेत रूपांतर झालेलेही आढळून येईल.

'अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस' (१९१४) या कवितेत निष्प्रेम जीवनाची व्यथा उत्कटतेने प्रकट झाली आहे. सगळे जग सुखाने निद्रा घेत असता मनातील असह्य व्यथा क्षणाचाही विसावा मिळू देत नाही या विचाराने विषण्ण झालेल्या दुर्दैवी जीवाच्या आर्त भावनांनी ही सारी कविता भारावून गेली आहे.

उदासीनता छाया पसरी,
सृष्टि दिसे जरि वरुनी हसरी—
खिन्नताच जरि अंतरि सारी,
व्यर्थ बोलतो, व्यर्थ डोलतो, संसाराचा गोल !

......

परंतु जेथे उदासीनता
व्याकुल करिते विषण्ण चित्ता
तेथं त्याला द्याया समता—
गाणें गावें, हेंच अलौकिक ईश्वरतेचें काम.

आपल्या हतभागी अंतःसृष्टीत आनंदाची आणि समाधानाची एखादी तरळती लहर थरारून जावी यासाठी कोकिळेच्या आलापाची या दुर्दैवी जीवाला तहान लागलेली आहे. रात्रीच्या खिन्न आणि भयाण एकान्तात असह्य विषण्णतेने त्याच्या मनात थैमान मांडले आहे.

निद्रा कुठली परि त्या हृदया भविष्य नाहीं ज्यास ?
हातीं संसाराची माती,
मनिंच्या आशा मनींच खाती
भूतकाळचीं भूतें रडती !

मिटल्या जाग्या डोळ्यांपुढती शून्याचें मैदान !
निष्प्रेमाची शेज सोबती
भयाण दुनिया सारी भंवतीं.
विषण्ण येती विचार चित्तीं,
बाह्यांतर विश्वांत खेळते उदासीनता एक !

निष्प्रेम जीवनाची ही कहाणी ‘फुलें वेचिलीं पण —’ या कवितेतही (जानेवारी १९१४) याच उत्कटतेने प्रकट झाली आहे.

हतभागी हा जीव एकला, प्रीतिदेवता नाहीं
मोडुनि पडलें हृन्मय मंदिर शतधा आघातांहीं !
निष्प्रेमाचें जीवन माझें रूक्ष चिंतनीं जावें,
संकल्पचि हा वरला ठरला, कां तें दैवा ठावें !

विषण्ण मनाचा, निराशेचा आणि उदास जीवनाचा उल्लेख अनेक कवितांमध्ये पुन्हा पुन्हा आला आहे. ‘विषण्ण मानस, उदास जीवन, पीत निराशागरा’ (‘पांखरास’), ‘मुक्याच इच्छा, आशा झाल्या कोणाच्या खाक ?’ (‘अरुण — दुसरा’). ऑगस्ट १९१५ मध्ये प्रसिद्ध झालेल्या ‘मनांतली दिवसरात्र’ या कवितेंतील पुढील ओळीं या संदर्भात महत्त्वाच्या आहेत :

तशीच मनिं सारखी वरिवरीच आशा चढे;
गमे क्षणच जाहली सफल, तोंच खालीं पडे......
विषण्ण हृदयीं तशी भयकरा निराशा जडे
तमोमय रसा गिळी मन मनीं बिचारें रडे !

आणि या असह्य यातना अनावर झाल्यावर पुढील आर्त उद्गार बाहेर पडणे अपरिहार्य आहे :

नको दिवसरात्र हीं न सरती कधीं जी पहा,
सरेल कधिं तो सरो हृदयिंचा लपंडाव हा !

आपल्या विषण्णतेत आणि औदासीन्यात गुरफटून जाऊन त्यातच काही विचित्र समाधान मानण्याची वृत्ती जिच्या ठायी प्रबळ झालेली असते अशा व्यक्तीच्या

मनातील आर्त भावनांचा हा उत्कट उद्गार मनाला चटका लावणारा आहे यात शंकाच नाही.

*

रोमँटिक कवींच्या ठायी नेहमी दिसून येणारे एक प्रकारचे विलक्षण औदासीन्य विफल प्रेमामुळेच निर्माण झालेले असते असे नाही. प्रेमभंगाच्या व्यथेमुळे, अथवा प्रेमाची वृष्टी जिच्यावर करावी अशी प्रेयसी सत्य सृष्टीत नसल्याने उत्पन्न होणाऱ्या व्यथेमुळे, विलक्षण औदासीन्य निर्माण होत असते. तथापि ही दोनही कारणे नसताना सुद्धा अनेक कवींच्या कवनांवर औदासीन्याची व विषण्णतेची दाट छाया पडलेली दिसते. व्यावहारिक जगतातील अनेक कटू अनुभव, भोवतालच्या लोकांची कृतघ्न व बेपर्वा वृत्ती, ज्या प्रकारच्या लौकिक यशाची प्राप्ती व्हावी यासाठी मन नेहमी तळमळत असते ते यश प्राप्त न झाल्यामुळे येणारी खिन्नता, जग सुधारावे असे वाटत असताही त्याच्यातील वैगुण्ये नष्ट करण्याच्या बाबतीतील असमर्थता, इत्यादी अनेक गोष्टींमुळे देखील औदासीन्य भावनावश मनाला ग्रासू शकेल. बहुतेक रोमँटिक कवींच्या जीवनात या गोष्टींची केव्हा ना केव्हा तरी उजळणी होऊन जात असते. इतरांच्या जीवनात या गोष्टी घडत नाहीत, आणि केवळ रोमँटिक कवींच्याच जीवनात त्या घडतात, असे मुळीच नाही. पण प्रतिभाशाली कवींना आपल्या व्यथांचा काव्यरूपाने आविष्कार करता येतो, आणि आपल्या भारावलेल्या मनाला विरंगुळा प्राप्त करून देता येतो. अलौकिक प्रतिभेमुळे कवी कल्पनेच्या जगतात मोठी सुंदर दृश्ये निर्माण करू शकतात. पण कल्पनेने निर्माण केलेले सौंदर्यपूर्ण जीवन, आणि वास्तव जगातील स्वतःचे अपूर्ण आणि हिणकस जीवन, यांच्यामधील तीव्र विरोध कवींना अतिशय उत्कटतेने जाणवतो, तो देखील या प्रतिभेमुळेच ! आणि विरोधाच्या या जाणिवेतून औदासीन्याचे आर्त आक्रंदन उचंबळून येत असते.

काही वेळा कोणतेही बाह्य कारण नसताना सुद्धा भावनावश माणसाला कसली तरी चमत्कारिक गूढ, अनिर्वचनीय हुरहूर लागून राहते — इतकेच नव्हे तर ते पराकाष्ठेचे उदासही होते. औदासीन्याचे कारणच जर कळले नाही तर त्या औदासीन्याचे निराकरण तरी कसे करावयाचे ? ज्या भावनावश कवींना असल्या अकारण गूढ हुरहुरीचा अनुभव आयुष्यात केव्हा ना केव्हा आलेला असेल त्यांनाच अशा अनुभूतीचा काव्यरूप आविष्कार समजेल आणि हृद्य वाटेल. गडकऱ्यांच्या काही कवनांतील औदासीन्य असेच अकारण निर्माण झाले असण्याचीही शक्यता आहे. त्यांच्या मनाची घडण आपण समजावून घेतली तरच अशा भावनाविष्काराचे मर्म समजेल.

आणि सुखाने समृद्ध असलेल्या जीवनाची प्राप्ती होऊन सुद्धा काही वेळा या गूढ भावनेची प्रतीती संवेदनशील भावनाप्रधान माणसांना येत नाही काय? 'रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान् पर्युत्सुको भवति यत्सुखितोऽपि जन्तुः' या ओळीत (शाकुन्तल, अंक ५) पर्युत्सुकत्वाची जी भावना कालिदासाने आविष्कृत केली आहे तिच्यातील मर्मही हेच आहे. कवी जर मुलखावेगळा भावनावश आणि संवेदनशील असेल, त्याच्या इच्छा जर अमर्याद असतील व त्या व्यवहारात उतरविण्याचे सामर्थ्य जर त्याच्यात नसेल तर मनोभंगाच्या व्यथांची मालिकाच त्याच्या नशिबी येईल, आणि कधीच नष्ट न होणाऱ्या औदासीन्याने त्याचे जीवन झाकाळून जाईल. गडकऱ्यांच्या बाबतीत असेच काहीतरी झाले असले पाहिजे.

औदासीन्याच्या या अतिरेकातूनच गडकऱ्यांच्या काही कवनांमधील भीषण प्रतिमाने निर्माण झाली असण्याची शक्यता आहे. 'स्मशानातील गाणे' आणि 'घुबडास' या कविता यासाठी पाहाव्या. 'स्मशानातील गाणे' या कवितेतील पुढील ओळी पाहा —

भयाण जागीं, भयाण काळीं
भयाण वृत्ती होत निराळी;
भयाण झाली ती आरोळी......
शांतीची ही स्मशानकारी......

'अरुण' (दुसरा) या नावाची गडकऱ्यांची जी कविता आहे तिच्यात या भीषणतेचा प्रकर्ष झालेला दिसून येईल.

किंवा कोमल बाला मेली तीव्र निराशांनी,
हृदया फोडुनि तिच्या प्रीतिची लाट चढे गगनीं!
मुक्याच इच्छा, आशा झाल्या कोणाच्या खाक,
रागानें ही लाल जाहली का त्यांची राख?

......

रविकिरणांचे भाले शिरले आकाशापोटीं,
रक्ताचें शिंपणें करी का जखम अशी मोठी?

......

मृतरात्रीची चिता उषा ही अरुणमया ज्वाला.

'रात्रीस ओरडणाऱ्या घुबडास—' या कवितेत प्रकट झालेले भीषणतेचे पुढील वर्णन पाहा —

आधींच भीषण निशा, तम त्यांत घोर.

*

बहुतेक साऱ्या रोमँटिक कवींना ऐतिहासिक काळातील गूढरम्य घटनांचे विलक्षण आकर्षण वाटत असते. विनायक, बालकवी, आणि तांबे यांच्या काही रमणीय कवनांमधून गूढ रम्यतेच्या या आसक्तीचा परिणामकारक आविष्कार झालेला आहे. स्मृतिचित्रांत दंग होऊन राहणाऱ्या गडकऱ्यांसारख्या संवेदनशील कवीला या गूढरम्यतेने भुरळ घातली असल्यास त्यात काही नवल नाही. गूढरम्यतेच्या या आसक्तीपोटीच 'कृष्णाकांठीं कुंडल' ही नितान्तरमणीय कविता त्यांनी लिहिली. रोमँटिक कवितेची अनेक मोहक वैशिष्ट्ये या कवितेत प्रकट झाली आहेत. 'सा रम्या नगरी' या भर्तृहरीच्या श्लोकात प्रतीत होणारी हुरहूर 'कृष्णाकांठीं कुंडल आतां पहिलें उरलें नाहीं' या पहिल्याच साकीत थरारलेली दिसून येईल. हे 'जुन्या जिवाचें गाणें' कवीच्या मनात 'नव्या भरानें' उचंबळून आले आहे. या स्मृतिचित्रांतील रंग आता किंचित् म्लान झाले असले तरी त्यांच्या मोहकपणात कसलाही उणेपणा आलेला नाही. विसाव्या शतकात शरीराने वावरणाऱ्या गडकऱ्यांचे मन अवचित तीनशे वर्षांपूर्वी घडून गेलेल्या घटनांच्या मदिर सौंदर्यात तल्लीन झाले. त्या दूरच्या घटना आत्ता, या स्थळीं, आपल्या डोळ्यांसमोर घडत आहेत, असा त्यांना भास झाला. आणि त्या रम्य चित्रातील उन्मादक छटांनी स्तिमित झालेल्या व उचंबळून आलेल्या त्यांच्या मनातील हळवे बोल कवनाच्या रूपाने बाहेर पडले—'शाहीराच्या रसवंतीला भावभेटिचें लेणें' प्राप्त झाले.

त्याच लकाकीमधें तळपत्या त्या एका राईत
कृष्णाकांठीं कुंडल शिकवी मायलेकरां प्रीत.
त्या राईतिल सगळ्या वेली एकच गाणें गाती,
त्या गाण्यांतिल प्रेमकहाणी वेड लाविते म्हणती.
प्रीतीचें तें गाणें होतें; सहज लागल्या नादीं
कोणी येतां जातां त्यांसी तेंच सांगती आधीं.

अशी ही भुरळ घालणारी प्रेमकहाणी ज्या मोहक वातावरणात घडून आली त्यातील गूढरम्यतेचा हा नमुना पाहा —

झुळझुळत्या वाऱ्यावर त्यांचीं पानें हलतांनाही
गुणगुणती तें गाणें; त्यांना छंदचि दुसरा नाहीं.
वाऱ्याची धुगधुगी हलवि, तरि वेली तें कुजबुजती
सोसाट्याचा सूर लागला तरी तेंच ओरडती.

हे प्रेमाचे धुंद गाणे त्या राईत कळ्यांफुलांच्या वेलपत्तीने पानापानांवर लिहिलेले आजही भावनावश रसिकाला दिसून येईल; आणि त्यामधील गहिऱ्या छटा पाहिल्या-बरोबर —

कृष्णाकांठीं कुंडल आतां पहिलें उरलें नाहीं !

असाच आर्त उद्‌गार न कळत त्याच्या तोंडून बाहेर पडेल.

गर्द वनराजींनी गजबजलेल्या सह्याद्रीच्या सान्निध्यात ही प्रेमकहाणी घडून आली. या प्रेमकहाणीत रुचिर सौंदर्य अगदी ओतप्रोत भरलेले आहे. प्रेयसीने प्रियकराला आपले हृदय अर्पण केल्यावर ते रमणीय दृश्य पाहून वेलीची पाने व फुले आनंदाने बेहोष झाली. आपले जीवन अनेक साहसांनी अगदी गजबजलेले आहे, आणि उलट तिचे जीवन सुखसमृद्धीने परिपूर्ण आहे, या कल्पनेने तिने आपल्याबरोबर येण्याचे साहस करू नये असे त्याला वाटते, व तो तिला म्हणतो,

तुझ्या कपाळीं सुबक बसावी बघ मोत्यांची जाळी;
करवंदीची कांटेजाळी परी आमुच्या भाळीं.

परंतु प्रीतीचा प्रभाव घोर संकटाच्या कल्पनेवरही सौंदर्याचा साज चढविण्यास समर्थ होता. ती त्याला लगेच म्हणते —

प्रीतीच्या पंखांनीं येइल टाकुनि मागें गगना
रायबागच्या राघूमागे ही मान्यांची मैना !

आणि त्या दोघांची मनमिळणी झाली. त्यांनी एकमेकांना प्रीतीची वचने दिली. पण कर्तव्याच्या पूर्तीसाठी त्याला स्वारीवर जाणे भाग होते. स्वारीवर निघताना आपल्या प्रेयसीचा तो गोड निरोप घेत होता, तेव्हा —

फुलाफुलांतुनि रंगत होती मधुर सुगंधी स्वप्नें !

पण ही रुचिर स्वप्ने थोड्याच वेळात विरली. आशांचा चक्काचूर झाला. लढाईत त्याच्या जिव्हारी घाव बसला आणि तो प्रेयसीला कायमचा सोडून गेला. या

भयंकर वार्तेने तिला अनावर शोक झाला, आणि तिचाही प्राण कुडी सोडून आपल्या प्रियकराला भेटावयास गेला. आणि —

ज्योत ज्योतिला मिळुनि गेली, माती मातीलाही !

*

या ठिकाणी गडकऱ्यांच्या प्रेमगीतांचा थोडा तपशीलवार विचार करावयाचा आहे.

या प्रेमगीतांमध्ये ज्या भावनांचे आविष्करण झाले आहे, त्या भावनांना खुद्द गडकऱ्यांच्या वैयक्तिक अनुभूतींचा काही आधार आहे की नाही हाच वादाचा मुद्दा असून त्यातून अनेक गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण झाले आहेत. स्त्रियांच्या बाबतीत गडकरी 'उदासीन' होते, ते 'स्त्रीविमुख' होते, ही प्रेमगीते एकाच व्यक्तीला उद्देशून लिहिलेली नाहीत, कित्येक गीतांमधील प्रेयसी पूर्ण काल्पनिक आहेत, गडकऱ्यांच्या स्फुट कवितांमधून त्याचे स्वतःचे चरित्र शोधणे युक्त नाही, प्रणयिनीवाचूनच गडकरी प्रणयी झाले होते — ही या संदर्भात माझ्या वाचनात आलेली महत्त्वाची विधाने आहेत.

गडकऱ्यांची ही प्रेमगीते म्हणजे त्यांच्या वैयक्तिक भावजीवनाची अगदी प्रामाणिकपणाने आणि मोकळेपणाने सांगितलेली कहाणी होय, असा माझा स्वतःचा या प्रकरणातील निर्णय आहे.

प्रणयाच्या क्षेत्रात निरनिराळ्या काळीं गडकऱ्यांना जे अनुभव आले, अथवा ज्या भावना त्या त्या वेळीं त्यांच्या मनात उत्कट झाल्या, त्या अनुभवांचा व त्या भावनांचा इतिहास त्यांच्या प्रेमगीतांमध्ये आढळेल. साहित्याच्या मार्गाने आपल्या अतृप्त इच्छांची परिपूर्ती करून घेण्याचा प्रकार अनेक वेळा दिसून येतो. तसेच अगदी पूर्ण काल्पनिक प्रेयसीवर प्रेमाची वृष्टी करण्याचा प्रकारही दिसून येतो. उदाहरणार्थ, खुद्द गडकऱ्यांच्याच बाबतीत असा प्रकार झालेला आहे. 'दिव्य प्रेमाची जाति' (फेब्रुवारी १९१४) या कवितेत प्रेयसीशी होणाऱ्या आत्यंतिक तादात्म्याचा महिमा वर्णिलेला आहे. पण हे तादात्म्य प्रेयसीशी प्रत्यक्ष झालेले तादात्म्य नसून असे तादात्म्य व्हावे या कल्पनेशी झालेले ते तादात्म्य आहे. आणि ज्या प्रेमाची या कवितेमध्ये इतकी विलक्षण महती कवीने गायिलेली आहे, ते प्रेमही वस्तुस्थितीतील प्रेम नसून ती प्रेमाची नुसती कल्पना आहे. तात्पर्य, हे अमूर्त (abstract) प्रेम आहे, आणि प्रेयसीशी होणारे तादात्म्यही कल्पनेच्याच राज्यातील आहे. 'हृदयशारदेस' या कवितेत गौरविलेले प्रेम हे देखील प्रत्यक्षातील प्रेम नसून ती प्रेमाची केवळ कल्पना आहे;

आणि जिच्यामध्ये आपण विरून जावे, जिच्याशी परिपूर्ण तादात्म्य पावावे अशी उत्कट इच्छा या कवितेत कवीने पुन्हा पुन्हा प्रकट केली आहे, ती प्रेयसीसुद्धा सत्य-सृष्टीतील प्रेयसी नसून प्रेयसीची ती केवळ कल्पना आहे. प्रत्यक्षात अशी एखादी प्रेयसी नेहमीच भेटते असे नाही. तथापि, कल्पनासृष्टीतील प्रेयसी ही खरीच प्रेयसी आहे अशी समजूत करून घेऊन सत्यसृष्टीतील उत्कटतेने तिच्यावर आपल्या भावनांचा वर्षाव करणे आणि कृत्रिम समाधान मिळविणे कलावंताला शक्य असते. कवितेच्या क्षेत्रात 'हृदयशारदा' ही काल्पनिक प्रेयसी निर्माण करून गडकऱ्यांनी काही काळ तरी कृत्रिम समाधान मिळविले. 'हृदयशारदेस' आणि 'दिव्य प्रेमाची जाति' या कवितां-मध्ये काल्पनिक प्रेयसीमध्ये गडकऱ्यांचे मन गुंतलेले दिसते हे अगदी स्पष्ट आहे. 'ओसाड आडांतील एकच फूल' ( नोव्हेंबर १९१४ ) या कवितेत 'प्रॉजेक्शन'चा प्रकार अगदी ठसठशीतपणे दिसतो. 'पुनर्विकसन' ( डिसेंबर १९१४ ), आणि 'हालत्या पिंपळपानास' ( डिसेंबर १९१४ ) या कवितांमध्ये निष्प्रेम जीवनाच्या जाणिवेतून निर्माण होणारे तीव्र दुःख प्रकट झाले आहे.

१९१४ मध्ये लिहिलेल्या ज्या कवितांचा वर उल्लेख केला आहे त्यांच्यातील भावनाविष्कार काल्पनिक प्रेयसीभोवती रुंजी घालीत आहे हे स्पष्ट दिसते.

*

पण १९१५ च्या नोव्हेंबरपासून १९१८ च्या फेब्रुवारीपर्यंतच्या सुमारे अडीच वर्षांच्या काळात गडकऱ्यांनी जी प्रेमगीते लिहिली त्यांच्यापैकी बहुतेक प्रमुख गीतांमध्ये खुद्द त्यांच्याच वैयक्तिक अनुभूतींचा आविष्कार असला पाहिजे, आणि या गीतांमध्ये प्रकट झालेल्या कमालीच्या उत्कट भावनांना सत्यसृष्टीतील घटनांचा बलवत्तर आधार असला पाहिजे असे मला निभ्रांतपणे वाटते. भावगीतांमध्ये उल्लेखिलेला 'मी' म्हणजे नेहेमीच खुद्द कवी असतो असे म्हणता यावयाचे नाही, हे मला मान्य आहे. प्रथमपुरुषी निवेदनाच्या द्वारे भावगीतात आविष्कृत झालेली भावना नेहमी खुद्द कवीचीच भावना असते असाही आग्रह धरता येणार नाही. तथापि आत्मलक्षी भावगीतांतील अत्यंत उत्कट भावनांचा तितकाच उत्कट आविष्कार वैयक्तिक अनुभूतींवाचून बव्हंशी अशक्य आहे असे मला वाटते. प्रत्यक्ष व्यवहारात घटना जशा घडल्या असतील तशाच त्या कवितेत संक्रांत होत नाहीत हे खरे आहे. तसेच त्या घटना साक्षात् घडत असता मनात ज्या भावना उद्भवल्या असतील त्यांची अभिव्यक्ती यथातथ्यपणे तत्क्षणी होणार नाही हेही खरे आहे. प्रत्यक्ष व्यवहारात घडलेल्या घटनांचे कलेत रूपांतर होताना मूळ घटनांवर काही संस्कार होणे अपरिहार्य असते. तसेच मनात ज्या भावनांचा साक्षात् कल्लोळ झालेला असेल त्या भावनांचे कलाकृतीत संक्रमण होत

असता त्यांच्यावरही काही संस्कार होणे अपरिहार्य असते. किंबहुना, सत्यसृष्टीत क्षोभकारक घटना प्रत्यक्ष घडल्याबरोबर, आणि त्या घटनांमुळे मनाचा विलक्षण क्षोभ झालेला असता, लगेच त्या भावना काव्यात संक्रांत होऊ शकत नाहीत. मनाच्या प्रक्षुब्ध अवस्थेत अशा भावनांचा आविष्कार शक्य नसून त्यासाठी मनाच्या थोड्याशा स्थिरतेची आवश्यकता असते. मूळच्या प्रक्षुब्ध मनाला ही स्थिरता प्राप्त होण्यासाठी जो कालावधी लागेल त्यामुळे मूळ भावनेवर संस्कार होऊन काही अंशांनी तरी तिचे रूपांतर होत असते. यामुळे वस्तुस्थितीतील घटना व भावना यांच्या वास्तव रूपामध्ये कल्पिताचे थोडे तरी मिश्रण होते. तात्पर्य, घटना जशा घडल्या असतील, अथवा जशा मूळच्या भावना असतील, तशाच नेमक्या त्या काव्यात संक्रांत होतात असे नाही. कलानिर्मितीच्या प्रक्रियेचे हे स्वरूप मान्य करूनही १९१६ मध्ये गडकऱ्यांनी लिहिलेल्या बहुतेक प्रमुख प्रेमगीतांमधील उत्कट भावनाविष्काराला वस्तुस्थितीतील घटनांचा आणि अनुभूतींचा आधार असला पाहिजे असेच मला आजही वाटत आहे. यासाठी गडकऱ्यांच्या चरित्रातील घटनांच्या इतिहासाचेही संशोधन करण्याचे कारण नाही. भावगीत हा प्रकार मुख्यत्वे आत्मनिष्ठ आहे. अशा या प्रकारात आत्मनिवेदनाच्या पद्धतीने जो भावनाविष्कार होतो तो सर्वस्वी दुसऱ्याच्या भावनांचा आविष्कार असतो, म्हणजे तो काल्पनिक भावनांचा आविष्कार असतो – कल्पनेने निर्मिलेल्या एखाद्या प्रतीकाभोवती त्या भावनांची गुंफण झालेली असते, असे एखाद्या वेळी फार तर घडेल. पण प्रतीकवादाचा असा आश्रय नेहमीच करता येणार नाही. शिवाय आत्मनिवेदनाच्या पद्धतीने प्रथमपुरुषी भावना कवनांमधून व्यक्त करणारा कवी प्रत्यक्ष आत्मानुभूतीचे वर्णन करीत नसून केवळ एखाद्या काल्पनिक प्रतीकाच्या भोवती त्या भावनांचे जाळे विणीत असतो असे क्षणभर मानले तरी देखील एकाच विशिष्ट प्रतीकाभोवती घुटमळत राहणाऱ्या कवीच्या मनात त्या प्रतीकाने कायमचे घर केले असले पाहिजे, त्या प्रतीकाची त्याच्या मनाला काही विलक्षण आसक्ती वाटत असली पाहिजे, एवढे तरी मान्य करावेच लागेल.

दुसरे असे की, स्वतःच्या भावनांचे आविष्करण न करिता इतरांच्याच भावनांचे आविष्करण करणे एवढाच हेतू या कविता लिहिताना गडकऱ्यांच्या मनात असता, तर यासाठी नाटकाचे साधन त्यांना उपलब्ध होतेच की! मग आत्मनिवेदनाच्या पद्धतीने, एकाच विशिष्ट प्रतीकात गुंग होऊन, त्यांनी अनेक भावगीते लिहिलीच का?

ज्या कवितांचा या दृष्टीने विशेष अभ्यास करणे आवश्यक आहे त्या साऱ्या मार्च १९१६ ते फेब्रुवारी १९१८ या दोन वर्षांच्या काळातील आहेत. 'निर्वाणीची विनवणी' (२ मार्च १९१६), 'हृदयास' (९ मार्च १९१६), 'एका शब्दासाठी

विनंती ' (२४ मार्च १९१६), ' निर्दय बालेस ' (मे १९१६), ' शेवटचे प्रेमगीत ' (१ जून १९१६), ' फणसाचे पान ' (१० फेब्रुवारी १९१८), ' जुन्या कवितांची आठवण ' (१६ फेब्रुवारी १९१८). यांपैकी पहिल्या पाच कविता मार्च १९१६ ते जून १९१६ या अवघ्या चार महिन्यांच्या काळातील असून शेवटच्या दोन कविता १९१८ च्या फेब्रुवारीमधील आहेत.

पहिल्या पाच कवितांतील भावनांची उत्कटता आणि तीव्र कटुता या गोष्टी अगदी विलक्षण आहेत. केवळ प्रतीकाच्या भोवती घुटमळत राहणाऱ्या कवीच्या भावनाविष्कारात असली उत्कटता येणे फार कठीण — किंबहुना, असंभाव्य — आहे एखाद्या प्रभावी नाटकातील भावनात्मक संघर्ष अत्यंत उत्कट झाला असता, ज्या उत्कटतेने नाटकातील व्यक्तींचा भावनाविष्कार होईल, त्याच उत्कटतेची प्रतीती या पाच कवितांमध्ये येईल. नाटकातील व्यक्तींच्या भावना स्वतःच्या कल्पनेने निर्माण करून नाटककार त्या प्रभावीपणे आविष्कृत करतो. यासाठी भावनांच्या उत्कट तीव्रतेला कारण होणारी घटना अथवा परिस्थिती त्याला अगोदर निर्माण करावी लागते. परिस्थितीच्या संघर्षातूनच भावनात्मक संघर्षाची निर्मिती होत असते. ज्या पाच कवितांचा मी उल्लेख केला आहे त्यांच्यामधील भावनाविष्कार अतिशय प्रभावी अशा उत्कट नाट्याने ओतप्रत भरलेला आहे. पण हा प्रभावी भावनाविष्कार नाटकातील नाही — तो भावगीतांमधील आहे. नाटकातील व्यक्तीच्या उत्कट भावनाविष्काराला नाटकातील विशिष्ट परिस्थितीची पार्श्वभूमी सिद्ध असते. असली परिस्थितीची पार्श्वभूमी भावगीतात सांगोपांग कल्पनेने निर्माण करणे असंभवनीय असल्यामुळे तिची उणीव स्वतःच्या वैयक्तिक अनुभूतीनेच प्राप्त करून दिलेल्या पार्श्वभूमीने भरून काढणे कवीला भाग पडते. सारांश, वर उल्लेखिलेल्या पाच कवितांमधील कमालीच्या उत्कट भावनाविष्काराला वस्तुस्थितीतील घटनांचा आणि गडकऱ्यांच्या वैयक्तिक अनुभूतींचा आधार असलाच पाहिजे असे पुन्हा पुन्हा विचार करूनही मला वाटत आहे.

*

' निर्वाणीची विनवणी ' ही कविता २ मार्च १९१६ रोजी लिहिलेली आहे. प्रेमभंगापोटी येणाऱ्या निराशेची भीती अगदी समोर उभी राहिली असताही पळत्या आशेमागे धावणाऱ्या, आणि मृगजळामागे सैरावैरा धावणाऱ्या हरिणाप्रमाणे खोटे समाधान मिळवू पाहणाऱ्या, भावनावश माणसाच्या मनःस्थितीचे प्रभावी चित्रण येथे आढळेल. ' निर्वाणीची विनवणी ' या शब्दांतूनच कवितेतील आशयाची स्पष्ट कल्पना येईल. प्रेयसीची ही शेवटची याचना आहे. आणि शेवटच्या याचनेतील आर्तपणा

तिच्यात ओतप्रोत भरलेला आहे. प्रेयसीच्या चरणांवर लीन झालेल्या दीन जीवाची ही केविलवाणी आळवणी आहे. प्रेयसीचे सौंदर्य आणि तिच्या वृत्तीतील निष्ठुरता यांच्यामधील विसंगती त्याच्या मनाला छळीत आहे :

सुंदर वदनीं तव निर्दयता हृदय विदारित माझें,
पडुं दे श्रवणीं ती शुभवाणी मौन न हे तुज साजे.
प्रत्युत्तर दे प्रश्ना कांहीं, अंत वृथा न पहावा,
विनोदवचनीं थांबवि नच त्या, प्रश्नें परतवि नच वा.

या कवितेत संशयाचे वातावरण आहे. पण संशय नष्ट होऊन नैराश्य हे सत्य ठरल्यावर वैतागाच्या ज्या तीव्र भावना निर्माण होतात त्यांचे उत्कट आविष्करण 'हृदयास' या कवितेत झाले आहे. ही कविता ९ मार्च १९१६ रोजी लिहिली आहे. जोपर्यंत संशयग्रस्ततेची अवस्था असते, आणि आशा करण्यास थोडी तरी जागा असते, तोपर्यंतच प्रेयसीची निर्वाणीची विनवणी करण्यात काही स्वारस्य असते. पण शेवटच्या आशेची शेवटची तिरीपही निराशेच्या भयाण अंधकारात विलीन होऊन गेल्यावर विनवणी तरी कोणाची करावयाची ? आणि कशासाठी करावयाची ? अनेक आघात सोसून दुखावलेल्या आणि हळुवार बनलेल्या मनाच्या सोशिकपणाचा अंत करणारे जहरी नैराश्य किती विलक्षण परिणाम करू शकते, आणि त्यामुळे कोमल भावनांचा चुराडा होऊन केवढा कडवटपणा मनात निर्माण होतो हे 'हृदयास' या कवितेत दिसून येईल. या कवितेतील भावनाविष्कार जितका उत्कट आहे तितकाच प्रामाणिक आहे. 'निर्वाणीची विनवणी' या कवितेत वेड्या आशेच्या अनावर ओढीमुळे उत्पन्न झालेली हळवी लीनता असली, तर 'हृदयास' या कवितेत असह्य नैराश्यामुळे भ्रमिष्ट बनलेल्या मनातील कडवटपणाचा डंख आहे. भावनांचा असला विलक्षण कडवटपणा अन्यत्र क्वचितच आढळेल. इतके दिवस प्रेम प्रेम म्हणून ज्याच्यामागे आपण लागलो होतो ते खरे प्रेम नसून प्रेमाचे हिडीस सोंग होते, आणि या नटव्या व ढोंगी प्रेमाने आपल्या उत्कट भावनांचे अक्षरशः धिंडवडे काढले अशी तक्रार करणारा प्रियकर या बेगडी प्रेमाचा मोह तात्बडतोब सोडून देण्यावाचून गत्यन्तर नाही, असे आपल्या हृदयाला बजावीत आहे. निर्वाणीची विनवणी करणारे दीन मन या ठिकाणी दगडाप्रमाणे कठोर बनलेले आहे.

जिवलग हृदया ! मूढ वृत्ति ही धारण केली कां असली ?
लाथ मार त्या चंचल जगता प्रेमाचीं सोंगें कसलीं ?

चंचल, लहरी, रंग बेगडी सुंदरतेच्या मोहानें
कां वाटेवर पडसी, हृदया ! विकुनी कवडी मोलाने ?
तुझ्या जिवाच्या बोलासाठीं हपापले हे रसिक पहा
स्वागत करि जा त्यांचें, त्यांना हर्ष किती होईल अहा !
नटव्या सोंगामागें लागे जें, त्या सौंदर्यासाठीं
नवलाखाचें मोल देसि कां ? कशास या आटाआटी ?
जिथें गुणाची चाड न कांहीं, कमअस्सल जें जातीचें
सौंदर्यचि तें कसलें ? केवळ एक बाहुलें मातीचें !
विद्यावैभव कुठें तुझें ? तो ज्ञानाचा गौरव कोठें ?
आणि कुठे रंगीत खेळणें ? नवल खरोखरि हें मोठें !
उदारता तव विशाल पाहुनि देवालाही मोह सुटे
आणिक असलें खोटेंनाटें नकली नाणें सांग कुठें ?
गर्वाचें घर खालीं पडुनी खुशाल मिळुं दे मातींत
रसिकांच्या मृदुहृदयमंदिरीं रहा निजयश मिरवीत.
चितारडसी कां चित्र जिवाचें पाण्यावरच्या रेषांनीं ?
' गोविंदाग्रज ' सांगे तुजला ' रहा त्याहुनी स्वस्थानीं ! '

' एका शब्दासाठीं विनंती ' ही कविता २४ मार्च १९१६ रोजी लिहिलेली आहे. कठोर शब्द वापरून दुखावलेल्या प्रेयसीची क्षमायाचना या कवितेत आढळेल. " आपण दोघे एकमेकांसाठीच असून एकमेकाना क्षमा करणे हे आपले कर्तव्यच आहे " असे प्रेयसीला उद्देशून प्रियकर म्हणत आहे.

क्षणमात्राचा राग अनावर— स्वभाव दोघांचा
समजुनि हें मग राग धरावा कोणी कोणाचा ?
जीवाच्या बागेंत खेळतो पक्षी प्रेमाचा
पिसामागुनी पिसें काढणें मार्ग न सुज्ञाचा.
पश्चात्तापें हृदय हलवितां अश्रूंच्या धारा
वाहुनि त्याला लाभूं दे तो मोत्यांचा चारा.
जें झालें तें विसरुनि सखये ! टाकुनि इतराजी
भला बुरा मी मान्य करुनिया होशिल ना माझी ?

‘ गोविंदाग्रज ’ आणुनि नयनें जीवाचें तोय
विनवित, बाळे! लिही स्वहस्तें तूंच पुढें— !

‘ निर्दय बाळेस ’ ही कविता १९१६ च्या मे महिन्यातील आहे. ‘ हृदयास ’ या कवितेत जो विलक्षण कडवटपणा आहे त्याचा लेशही या कवितेत दिसणार नाही. उलट, एक प्रकारचा दीनवाणेपणा आणि स्वतःच्या कंगाल नशिबाविषयीची अनुकंपा, याच गोष्टी येथे दिसतील. जिच्यामुळे मनोभंग झाला तिला दूषण देण्याऐवजी आपल्या दुर्दैवाचा आणि वेड्या प्रेमाचाच अधिक्षेप प्रियकर करीत आहे. जिच्या चरणी सर्वस्व अर्पण केले, तिने वंचना केल्यामुळे व्यथित झालेल्या जीवाचे हे आर्त आक्रंदन पाहा —

रूप मनोहर असलें, बुद्धिहि तीव्र लाभली तुजला
खऱ्या गुणाची पारख कांहीं असेल तव हृदयाला —
वेडी आशा अशी धरुनिया धडा जिवाचा केला
भल्याबुऱ्याचा भेद न तुजला, अनुभव भलता आला!
केल्या ज्याच्या पायघड्या मी तुझ्या पावलांसाठीं
त्या हृदयाला तुडवुनि गेलिस नटव्या थाटापाठीं.
जग सगळें हें डोळ्यांपुरतें, रूप जिवाला पुरतें
उदार हृदया परि निर्दय जग दगडाखालीं पुरतें!

‘ हृदयास ’ व ‘ निर्दय बालेस ’ या दोन कवितांत प्रणयभंगाचाच आविष्कार असला तरी त्या आविष्काराच्या पद्धतीत मात्र फार फरक आहे. वंचना करणाऱ्या प्रेयसीची अत्यंत कटू शब्दांत केलेली निष्ठुर निर्भर्त्सना ‘ हृदयास ’ या कवितेत आढळेल. ‘ निर्दय बालेस ’ या कवितेत या निष्ठुर निर्भर्त्सनेचा लेशही नाही. उलट, स्वतःविषयीच अनुकंपा सर्वत्र दिसून येत असून आपल्या ‘ भिकारी भाग्यदेवतेला ’ बोल लावण्याकडेच प्रियकराचा कल दिसून येत आहे. इतकेच नव्हे तर, ज्या प्रेमामुळे हे दुःख सहन करण्याची पाळी आली त्या प्रेमाचाच त्याला तिरस्कार आला आहे, आणि इतःपर प्रेमाचे नाव सुद्धा घ्यावयाचे नाही, असा निर्धार त्याने केला आहे.

दिला तिलांजलि अश्रूंचा हा त्याग प्रेमाच्या नांवा
परतायाचें नाहीं आतां त्या प्रेमाच्या गांवा.

‘ शेवटचें प्रेमगीत ’ ही कविता १ जून १९१६ ची आहे. भावनांचा तीव्र कडवटपणा आणि नैराश्याच्या पोटी निर्माण झालेला वैताग, या गोष्टी लयाला जाऊन

प्रेयसीचे प्रेम निदान पुढच्या जन्मी तरी लाभेल, या वेड्या आशेत थोडेतरी समाधान मिळवण्याची आशा प्रियकर करीत आहे. प्रेमनिराशेच्या तीव्र आवेगाच्या क्षणी प्रेयसीविषयी जी तिरस्काराची व द्वेषाची भावना निर्माण झाली होती तीही नष्ट झाली असून तिची जागा कारुण्याने घेतली आहे.

यत्न केले, सखे, रत्न तुजसारखें । कधिं तरि व्हावया प्राप्त हातां ।
अन्य घटना परी नाकळे कां करी । देव कीं दैव कीं तो विधाता ॥

जन्म हा व्यर्थसा होत; होवो तसा । सर्वथा शिवपरा ईशसत्ता ।
प्रेमयज्ञाप्रति प्रथम ही आहुति । अपरिहार्यांच जी जीवजाता ॥

एक आशा उरे—( तीच मज पुरे ) । तिजसवें जीव करि एकमयता ।
‘ जन्मजन्मांतरीं एकदां क्षणभरी । प्रेम लाभो तुझें शोकघाता ॥ ’

१९१६ मधील या पाच कवितांमधील भावनाविष्कार इतका उत्कट आणि नाट्यपूर्ण आहे की, त्यांना खुद्द कवीच्या वैयक्तिक अनुभूतींचा आधार असला पाहिजे असे वाटू लागते. अवघ्या तीन महिन्यांच्या काळात या कविता लिहिलेल्या आहेत ही गोष्ट देखील महत्त्वाची आहे.

*

याच काळात गडकऱ्यांची आणखी एक गाजलेली कविता प्रसिद्ध झाली. ‘ प्रेम आणि मरण ’ ही ती कविता. ही कविता मासिक ‘ मनोरंजना ’च्या १९१६ च्या एप्रिलच्या अंकात प्रसिद्ध झाली. सर्व कविता रूपकात्मक ( allegorical ) आहे. मानवी भावनांची काही आंदोलने अशी विचित्र असतात की त्यांचा आविष्कार स्पष्ट-पणे वाच्यार्थाने करण्याऐवजी पर्यायोक्ताचा आश्रय घेऊन करणे कवींना सुलभ व प्रशस्त वाटते. ‘ वेडा ’ व ‘ ओसाड आडांतील एकच फूल ’ या उत्कृष्ट कविता अशाच प्रकारच्या आहेत. ‘ प्रेम आणि मरण ’ या कवितेतील रूपक स्पष्ट करतो : मैदानातील एकुलत्या एक वृक्षाला एकदा आकाशात वीज चमकलेली दिसली. तत्क्षणी त्याला त्या बिजलीचे वेड लागले. तिच्या प्राप्तीचा त्याला ध्यास लागला. हा विचित्र ध्यास त्याने सोडून द्यावा यासाठी साऱ्या देवांनी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. पण तो वृक्ष हट्ट सोडावयास तयार होईना. अखेर एक दिवस त्याची आशा सफळ झाली. वीज कडाडून खाली आली, आणि वृक्षाला अगदी कडकडून भेटली. त्या भेटीमुळे वृक्षाची तीव्र आसक्ती सफळ झाली हे खरे. पण मीलनाच्या या क्षणातच त्याचे मरण सामावलेले होते.

तथापि, त्या वृक्षाला जळून जावे लागले तरी प्रेमाच्या साफल्याचा दिव्य क्षण त्याला लाभल्यामुळे त्याचे जीवन कृतार्थ झाले.

दुभंगून खालीं पडला
पारि पडतां पडतां हंसला । एकदां ।
हर्षाच्या येउनि लहरी ।
फडफडुनी पानें सारीं । हांसलीं ।
त्या कळ्या सर्वही फुलल्या !
खुलल्या त्या कायम खुलल्या । अजुनिही ।
तो योग । खरा हटयोग । प्रीतिचा रोग ।
लागला ज्याला । लाभतें मरणही त्याला । हें असें ।

गडकऱ्यांच्या काही कवितांतील कल्पनाविलास कितीही रमणीय असला तरी भावनांचे अतिशय आर्त आणि रसरसलेले आविष्करण हेच त्यांच्या कवित्वाचे सर्वात महत्त्वाचे कार्य होय. रसरसलेल्या उत्कट भावना हेच गडकऱ्यांच्या जीवनाचे सार आहे. असल्या आत्यंतिक भावनांच्या उद्रेकाने अन्तर्बाह्य भारून गेलेला, ज्याचे सारे जीवनच भावनामय झालेले आहे, असा दुसरा कवी निदान मराठीत तरी आढळणार नाही. गडकऱ्यांची ही उत्कटता ( intensity ) मराठी काव्याच्या क्षेत्रात तरी अपूर्व आहे. आणि तिचा आविष्कारही तितकाच अपूर्व आहे. या उत्कटतेमुळेच त्यांच्या कवनातील वैगुण्ये धुक्याप्रमाणे वितळून जातात.

प्रेमगीतांमधील भावना गडकऱ्यांनी सत्य सृष्टीतील व्यक्तीला उद्देशून प्रकट केल्या असोत की नसोत, एक गोष्ट त्रिवार सत्य आहे. उत्कट भावनांचा मनोरम आविष्कार ज्यांच्यामध्ये आहे अशी काही अद्वितीय गीते गडकऱ्यांच्या प्रतिभेने निर्माण केली आहेत. उत्तररामचरित्रातील ‘ ते हि नो दिवसा गताः ’ या आर्त उद्गाराच्या आधाराने लिहिलेले ‘ स्मृतिगीत, ’ ‘ ती कोण ? ’, ‘ हे सुनीत ’, ‘ त्याच तारकेस याचना ’, ‘ गोफ ’, ‘ कधी ? ’, ‘ जीवितास ’, ‘ पुनर्जात प्रेमास ’, ‘ वेडा ’, ‘ ओसाड आडांतील एकच फूल ’, ‘ तीन तरी ’ ‘ अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस ’, ‘ फुले वेंचिली पण— ’ ही गीते भावनोत्कटता आणि रचना या दोनही दृष्टींनी पहिल्या प्रतीची आहेत. या गीतांच्या जोडीला १९१६ ते १९१८ या काळात लिहिलेली प्रेमगीते वाचली असता गडकऱ्यांच्या भावनाविष्काराच्या जातीचा यथार्थ परिचय होईल.

‘ काव्य भराया जित्या जिवाचें जातिवंत करणेंच हवें ! ’ असे स्वतः गडकऱ्यांनी

‘ काव्याची व्याख्या ’ या कवितेत म्हटले आहे. ‘ जित्या जिवाचें जातिवंत करणें ’ म्हणजे रसरसलेली उत्कट अनुभूती. आणि रसरसलेल्या उत्कट अनुभूतींचा तितकाच उत्कट आविष्कार करणे हे गडकऱ्यांच्या दृष्टीने काव्याचे सर्वांत स्पृहणीय कार्य होय.

गडकऱ्यांच्या काव्यकलेचे सारे मर्म उत्कट अनुभूतींच्या या आविष्कारातच साठविलेले आहे. अतृप्त आकांक्षा, वेड्या आशा, इच्छाचित्रे, केवळ स्वप्नसृष्टीतच सफल होऊ शकतील असे ध्यास, निष्काम व उदात्त प्रेमातील पावित्र्य, प्रेमभावनेचा पहिला तरळता साक्षात्कार, आशानिराशांच्या संदेहातील गूढरम्य हुरहूर, प्रेमसाफल्याची सोनेरी स्वप्ने, प्रेममूर्तीच्या परमोच्च क्षणात साठविलेली उत्कट सुखाची परिसीमा, आणि त्या क्षणातच सुप्त असलेली नैराश्याची तीव्र दाहकता, प्रणयाची दारुण वंचना झाल्यामुळे होणाऱ्या तीव्र वेदना, आणि या वेदना सहनशक्तीच्या पलीकडे गेल्यामुळे लागलेला मृत्यूचा ध्यास, या साऱ्या विविध सूक्ष्म भावनांचा गडकऱ्यांच्या कवनांमधून जसा सरस व उत्कट आविष्कार झालेला दिसतो, तसा तो अन्य कोणाही मराठी कवीच्या कवनात दिसत नाही, असे म्हटल्यास त्यात अतिशयोक्ती होण्याचे मुळीच भय नाही.

रा. शं. वाळिंबे

## १. अल्लड प्रेमास

क्षणभर वेड्या प्रेमा थांब !
अधिर मनासह जासी कोठें ?
चुकशिल—संकटिं पडशिल वाटे,
जग हें सारें बा रे खोटें !
हृदया सोडुनि; गड्या म्हणोनी, जाइं न कोठें लांब !

क्षणीं पांढरा, क्षणींच काळा,
रंग आवडे असा जगाला,
ठाव तयाचा कुणा न कळला !
खुळ्या तुलाची, अशा जगाची, कळेल का कृति सांग ?

जग सगळें हें देखाव्याचें !
गुलाम केवळ रे स्वार्थाचें !
स्मशान कीं हें शुद्धत्वाचें
शुद्ध भाबडें, सरळ रोकडें, अशांत करिशिल काय ?

प्रेमा येथें शपथ लागते !
प्रासावांचुनि कविता अडते !
कर्त्यावांचुनि कार्यहि घडतें !
देव बिचारा, तया न थारा, तुझी कथा मग काय ?

तुझ्यासारखा तुला सोबती—
मिळेल का या अफाट जगतीं ?
—संकुचितहि हें अफाट जरि अति—
आणी न मना, अशी कल्पना, अगदीं भोळा सांब !

कोणी तुजला मानिल खोटें,
तिरस्कारही दिसेल कोठें,
अपमानाचेंही भय मोठें,
बाग जगाची, ही न फुलांची, कांटे जागोजाग !

टाकिल कुणि तुज धिक्कारानें,
रडविल किंवा उपहासानें,
फसविल नकली कीं मालानें,
कोणी भटकत, उगाच रखडत, फिरविल मागोमाग !

म्हणुनि लाडक्या ! कुठें न जाई,
या हृदयांतचि लपुनी राही,
योग्य मित्र नच सुख तरि नाहीं !
कुसंगतीहुनि, वेड्या ! मानीं, फार बरा एकान्त !

१९०९

[ पुढें तो घायाळ होऊन मेला तेव्हा— ]

जीव सांडुनी पडला माझा जीवाचा अलबेला।
तोंडीं माती पडुनि रंगला जोबनरसरंगेला ॥

शिवबांच्या शिरपेंचासाठीं—बोली ठरली होती—।
तोडुनि मंगलसूत्र जिवाचीं देणें माणिकमोती ॥

शिवनेरीच्या शिवा, कसा हो केला माझा घात ?
हातावरचा राघू नेला उडवुनि हातोहात ॥

घारीनें झडपिला हातिंचा बघतां बघतां हार।
पुढतीं केला हात जरा तों विरून गेली गार ॥

चुना लाविला पानाला तो अजुनि वाळला नाहीं।
विडा घेतल्यावांचुनि केली कां हो इतकी घाई ?

असें जसेंच्या तसेंच वठलें जातें पाउल तुमचें।
पाय काढिला इथून पुरता; पुन्हां न परतायाचें ! ॥

अखंड भरला नव रंगांनीं हा इष्काचा प्याला।
दुनिया झुकती है ये हरदम; नहीं झुकानेवाला ! " ॥

[ संदर्भ न लागणाऱ्या ओळी ]

जशी रानच्या पत्रीसाठीं रुसे मंगळागौर।
रुसा साजणी; फुलते गुलशन दिलेचमनकी और ॥

लपंडाव हा सरला, राया, राज्य तुम्हांवर आलें।
हंसेल बाई या बोला ही साधीभोळी राई।
" कृष्णाकांठीं कुंडल आतां पहिलें उरलें नाहीं " ॥

[ त्या शोकानें तिचा अंत झाल्यावर – ]

ज्योत ज्योतिला मिळुनी गेली, माती मातीलाही।
" कृष्णाकांठीं कुंडल आतां पहिलें उरलें नाहीं " ॥

( अपूर्ण )

## ०. विचार

[ विचार ज्याच्या त्याच्या पाठीस लागलाच आहे;
त्याची ओळख कशाला करून घावयाला पाहिजे ? ]

[ १ ]

विचार करितां तुजविषयीं
गुंग विचारा ! मन होई. ॥ ध्रु० ॥

दिवसभरी करुनी धंदा
गुलाम पोटाचा बंदा
पडे न तो थकव्यासाठीं;
तोंच लागसी त्यापाठीं !
ताळतंत्र न तुला कांहीं
आदि अंत तुजला नाहीं !

दया न अंतरिं
करिही स्वारी,
सदा तयांवरि—
खपती जे पोटावारी
या जगताच्या बाजारीं.

[ २ ]

तूं असती बहु नवलपरी,
विश्रांतीचा कामकरी;
निद्रा तव करितां नाश,
स्वप्नांतहि देसी त्रास !
झोंप जागती तयांप्रती,
ज्यांसीं तूं धरिसी हातीं.

नसल्या आधि
स्वैर शतावधि
निर्मुनि आधी,
क्षणोक्षणीं मग वाढविसी
विश्वामित्र दुजा गमसी !

[ ३ ]

विपत्तिकाळीं आम्हांसी,
न कदाही टाकुनि जासी !
मित्र म्हणावें तुला जरी,
देह जाळिसी सदा तरी !
शत्रु म्हणावें जरि तुजशीं
यत्न हितास्तव तरि करिशी !

“ कसें करूं मी ? ”
“ काय करूं मी ?
ध्रुवपद नामी
हें तुझिया रडगाण्याचें,
नांव न संकट जाण्याचें,

[ ४ ]

करिसी एकान्तीं गर्दी,
एकान्तहि जनसंमर्दीं,
जागा असतां कुणि त्यासी,
पुढचीं स्वप्नें दाखविसी !
निजतां कोणी त्याकरवीं,
करविसी तूं कामें बरवीं.

देइन म्हणशी,
सुंदर खाशी,
" उद्यां " नराशीं
" आज " हातिची परि हरिसी,
मृगजळिं मनुजा खेळविशी !

[ ५ ]

पुत्र भविष्यत्कालाचा,
जन्मसि त्याआधीं साचा.
चिंता जननी तुझी जरी,
घात इच्छिसी तिचा तरी.
वाढायाची गति अतुला,
काळाहुनि बहु वेग तुला.

दीन जनांवर,
लोभ अनावर,
करिसि निरंतर,
विचित्र लीला जशी तुझी
तशी नाढळे जगीं दुजी !

## ७१. विराम चिन्हें

जेव्हां जीवनलेखनास जगतीं प्रारंभ मीं मांडिला,
जो जो दृष्टिंत ये पदार्थ सहजीं वाटे हवासा मला !
बाल्याची पहिली अशी बदलती दृष्टी सदा बागडे,
तेव्हां ‘ स्वल्पविराम ’ मात्र दिसती स्वच्छंद चोंहींकडे !

आहे काय जगांत ? काय तिकडे ? हें कोण ? कोठें असे ?
सांगा ईश्वर कोण ? त्यापलिकडे तें काय ? केव्हां ? कसें ?
जें तें पाहुनि यापरी भकतसे, दृक् संशयें टाकित,
सारा जीवनलेख मी करितसे तैं ‘प्रश्नचिन्हां’कित,

अर्धांगी पुढती करी वश मना शृंगारदेवी नटे,
अर्धें जीवन सार्थ होइल इथें साक्षी मनाची पटे,
प्रेमानें मग एकजीव बनतां भूमीवरी स्वर्ग ये !
केला ‘ अर्धविराम ’ तेथ; गमलें येथून हालूं नये !

झाली व्यापक दृष्टि;-चित्त फिरलें साश्चर्य विश्वांतरीं,
दिक्कालादि अनंतरूप बघतां मी होत वेड्यापरी !
सूक्ष्मस्थूलहि सारखीं भ्रमविती, लागे मुळीं अंत न,
त्याकाळीं मग जाहलें सहजची ‘ उद्गार ’ वाची मन ।

आशा, प्रेम, नवीन वैभव, तशी कीर्तिप्रमा, सद्यश—
हीं एकेक समर्थ आज नसतीं चित्ता कराया वश ।
सर्वांचा परमोच्च संगम चिरं जेथें जाहला,
देवा ! ‘ पूर्णविराम ’ त्या तव पदीं दे शीघ्र आतां मला !

## ७२. केशवसुतांची कविता वाचून—

शिवरायाच्या मागें आम्ही लालमहालीं फिरणें,
तसेंच तुमच्या मागें आम्ही नवीन कविता करणें;
असेंच कांहीं कांहीं करुनी जीवित त्याला गणणें—
'गोविंदाग्रज' म्हणे असे हें आम्हां लाजिरवाणें.

## १ अल्लड प्रेमास

कोणावर तरी सर्वस्वाने प्रेम करावे अशी अंतःकरणात उत्कट इच्छा आहे; पण स्वार्थाने आणि दांभिकतेने भरलेल्या बाहेरच्या जगात असे कोण असणार, की ज्याला या विशुद्ध निर्मळ प्रेमाची कदर वाटेल ? बाहेर जाऊन अपमानित व वंचित होण्यापेक्षा त्याने अंतःकरणात राहावे हे बरे, हा साधा विचार तितक्याच साध्या शैलीने या कवितेत व्यक्त केला आहे.

प्रेम हा दोन अंतःकरणांतील एक संबंध आहे असे गृहीत धरल्यास, एकाच अंतःकरणातील त्याचा निरपेक्ष उदय काहीसा शंकास्पद वाटतो. दुसऱ्याच्या संबंधातच प्रेम उद्भवते. ते अगोदर उद्भवते व नंतर कोणाचा शोध घेते असे मानणे कठीण आहे. म्हणून प्रेम म्हणजे प्रेम करण्याची इच्छा असेच येथे गृहीत धरावे.

देखावा, स्वार्थ, नकली, इ. शब्दांतून प्रकट होणारे 'जगा'संबंधीचे मत सांकेतिक व सरधोपट असले तरी—

प्रेमा येथे शपथ लागते
प्रासावाचुन कविता अडते

अशा सुंदर व त्या कालाच्या मानाने साहसी ओळींनी त्या विचारास काही धारा दिली आहे.

शेवटच्या कडव्यात 'योग्य मित्र' असा उल्लेख आहे. त्यावरून व एकूण कवितेवरूनही 'प्रेम' हा शब्द येथे व्यापक अर्थाने घेणे इष्ट आहे. एकाकीपणा असह्य झाला आहे, पण व्यवहारात बाहेरच्या जगाचा जो अनुभव येतो त्यामुळे 'सोबती' शोधायचा धीर होत नाही – ही काळजाची तडफड येथे प्रकट झाली आहे.

## २ केशवसुत मेले ?

केशवसुतांचे काव्य गडकऱ्यांना केवळ प्रिय होते असे नाही.. ते त्यांचे एक श्रद्धास्थान होते. या श्रद्धेचे दर्शन या कवितेमध्ये घडते. ही कविता १९११ मधील आहे. या काळात केशवसुत लोकांनाच काय, पण रसिकांनाही फारसे परिचित नव्हते, हे लक्षात घेतले म्हणजे गडकऱ्यांच्या काव्यविषयक आकलनाची महती ध्यानात येते.

पहिल्या काव्यातील ‘ शैली ’चा निर्देश परमार्थाने घेण्याचे कारण नाही. मुक्ततेचा आणि मानवतेचा पुरस्कर्ता असलेला शेली हा तत्कालीन भारतीयांना आदर्श व नव्या मनूचा प्रतिनिधी वाटत असे. केशवसुतही अशा मुक्ततेचे उपासक आणि नव्या युगाचे ‘ शिपाई ’ होते. केशवसुतांना गडकरी शेली समजतात ते याच अर्थाने. पाचव्या कडव्यात केशवसुतांच्या अनेक कवितांचा उल्लेख केलेला आहे. ‘ अणुरेणूमधुनी आता । निघतील तयांचे चेले ’ ही गडकऱ्यांची भविष्यवाणी पुढे खरी झाली.

## ३ स्मृतिगीत

हे गीत अनुवादात्मक असले तरी त्यातील सरळ भावाविष्कारामुळे व नितळ शैलीमुळे ते फार हृदयंगम वाटते. रंगभूमीसाठी हे गीत लिहिले होते हेही त्याच्या वेगळ्या शैलीचे कारण असू शकेल.

## ४ गुलाबी कोडे

गोविंदाग्रजांना लोकप्रियतेच्या शिखरावर आरूढ करणाऱ्या ८–१० कवितांतील ही एक कविता. एका मधुर सुंदर कल्पनेवरती या कवितेची उभारणी आहे. सूर्याच्या स्पर्शाने पश्चिम दिशा तांबडीलाल होते हे ठीक आहे, पण हा स्पर्श जिला होत नाही ती पूर्वदिशाही त्या वेळी लाल का होते, या प्रियेच्या प्रश्नाला पतीने जे उत्तर दिले आहे ते कवीच्या चतुर कल्पकतेची साक्ष देणारे आहे. कविता कथेच्या स्वरूपात असून तिच्यातील चित्रात्मकता प्रभावी आहे.

## ५ मनातली पाल

शिर-टीपेत कवीने जे म्हटले आहे त्याच्या अनुरोधाने कविता जेथपर्यंत जाते तेथपर्यंत ( म्हणजे ४ थ्या कडव्यापर्यंत ) ती हृद्य वाटते. पुढे मात्र वेदान्ती परिभाषेत शिरून ती अकारण क्लिष्ट झाली आहे.

## ६ आंधळ्यांची माळ

देवाकडे उद्यासाठी 'दृष्टी' न मागता आजसाठी फक्त भाकरीची भीक मागणारे आंधळे हे खऱ्या ज्ञानविज्ञानाची साधना न करता, केवळ तात्कालिक गरजांसाठी आक्रोश करणाऱ्या समाजाचे प्रतीक असावे.

## ७ एखाद्याचे नशीब

तीन रूपकांच्या द्वारा अभागी माणसाच्या दुर्दैवाचे करुणास्पद चित्र या कवितेत कवीने समर्पक शब्दांत उभे केले आहे. अगोदर रूपकांची मांडणी करून आपल्या अंतःकरणात सलणारा विचार कवीने शेवटी या रूपकांतून निष्कर्षित झाल्याप्रमाणे सांगितला आहे. तटस्थतेने चितारलेल्या शब्दचित्रांतून अखेरच्या व्यक्तिगत प्रार्थनेशी आपण येतो व तिच्यातील उत्कटतेत सर्वच कविता भिजून जाते, हे रचनेचे कौशल्य.

## ८ राजहंस माझा निजला

गडकऱ्यांच्या काव्याला या एका कवितेने दिवाणखान्यातून माजघरात नेले आणि नुसते नेले असे नाही, तर महाराष्ट्रातील सहस्रावधी माजघरे आसवांनी, हुंदक्यांनी आणि उसाशांनी धुमाळून टाकली. एकच वर्ष नव्हे तर अनेक वर्षे हे घडत राहिले. एखादी स्त्री उद्धवाच्या वाहत्या चालीवर ही कविता गाते आहे आणि भोवती बसलेले स्त्री-पुरुष श्रोते हुंदक्यांनी धुमसत आहेत असे दृश्य कितीतरी प्रौढांना आजही आठवत असेल. आधुनिक काव्यातील सर्वांत अधिक वाचली, गायिली व अनुभवली गेलेली ही कविता असेल. या कवितेनेच 'उद्धवा'चा 'राजहंस' केला. कवितेचे हे सामर्थ्य कशात आहे?

'राजहंस' हे एक नाट्यगीत आहे. नाट्यगीतात कवी स्वतःच्या भावनेचे वा अनुभवाचे चित्रण करीत नाही. दुसऱ्या कोणत्या तरी व्यक्तीचे अथवा तिच्या जीवनातील प्रसंगाचे चित्र तो रेखाटीत असतो. हे अर्थात तो त्रयस्थपणाने करीत नाही. त्या व्यक्तीशी अथवा प्रसंगाशी भाववृत्तीने एकरूप होऊनच तो असे काव्य लिहीत असतो. ही एकरूपता जितकी अधिक उत्कट व अधिक खोलवर रुजलेली असेल त्या प्रमाणात

ते नाट्यगीत अधिक प्रत्ययकारी होते. प्रतिभाशाली कवीच्या संवेदना व जाणीवा इतक्या विविध आणि व्यापक असतात, की इतर अनेकांच्या अनुभवात तो सहजतेने प्रवेश करतो, किंबहुना ते इतरांचे अनुभवच त्याच्या मनात प्रवेश करतात आणि त्याच्या जाणीवांचा आधार घेऊन शब्दरूप धारण करतात. नाट्य हे काव्याच्या जवळचे, किंबहुना त्याच्याच कक्षेतले मानले जाते ते याचमुळे. गडकऱ्यांच्या प्रतिभेत हे व्यापकतेचे सामर्थ्य होते आणि म्हणूनच काव्य व नाटक या दोन्ही प्रांतांत ती अधिकाराने संचार करीत असे. नाट्यगीत हे काव्यांतर्गत असले तरी नाट्याचे वरील गुण त्यात प्रकट होतात.

राजहंस हे एका नव-विधवेचे 'स्वगत' आहे. पतिनिधनानंतर एकुलत्या एक अपत्याचे निधन पाहण्याची आपत्ती अल्पकाळात तिच्यावर ओढवली आहे. मेलेले मूल तिच्या मांडीवर आहे आणि त्याला नेण्यासाठी 'जन चार भोवती जमले' असा हा प्रसंग आहे. काहीशा भ्रमिष्ट अशा मनःस्थितीत तिने काढलेले उद्गार म्हणजे ही कविता. भोवतालच्या लोकांना उद्देशून ती कित्येकदा बोलत असली तरी हे त्यांच्याशी केलेले भाषण नव्हे, तिच्या अपार कोंदटणाऱ्या दुःखाचा हा एक आत्मगत उच्चार आहे, असेच समजायला हवे. 'मुरली' प्रमाणेच 'राजहंस' ही कविताही मूलतः गीताच्या स्वरूपाची आहे. तिचे यथायोग्य आकलन होण्यासाठी, तिच्या प्रवाहात वाहून जाण्यासाठी ती 'चाली'वर म्हणणे वा ऐकणे आवश्यक आहे.

पुत्रवियोगाने दुःखी झालेली स्त्री अशा प्रसंगी असा अलंकारिक आक्रोश करील का, असा आणि अशा प्रकारचे काही आक्षेप या कवितेवर घेण्यात आले आहेत. ते निरर्थक, काव्याच्या मूलभूत स्वरूपासंबंधीचे अज्ञान दर्शविणारे आहेत. काव्य म्हणजे साक्षात् एखादी घटना नसते, तर त्या घटनेचा आत्मा काबीज करू पाहणारे, तिच्यातील भावाशय प्रगट करू पाहणारे ते एक शब्दात्मक, रसपूर्ण निवेदन असते. हे मान्य केले नाही तर 'राजहंस'च काय, कोणतीही कविता असंभवनीयच ठरेल. पुत्रवियोगाचे मातेचे दुःख शब्दांनी नव्हे तर स्वरांनी पकडलेल्या एखाद्या हंबरड्यातच व्यक्त करावे लागेल. भावविवशतेची तार 'राजहंसा'त वाजवीपेक्षा जास्त ताणली आहे अशी टीका करणारे टीकाकारही हे एक 'नाट्यगीत' आहे हे विसरतात. 'या माझ्या मानस-सरसी...' आणि 'ते वैकुंठेश्वर गेले...' या दोन कडव्यांत मात्र माता मागे सरते आणि गडकरी पुढे डोकावतात. त्यामुळे ती दोन कडवी कवितेच्या ओघात दांडगाईने

घुसल्यासारखी वाटतात व सरळ प्रवाहाला व्यत्यय आणतात. स्वीकृत भूमिकेशी असलेली एकरूपता या ठिकाणी कमी पडली आहे एवढेच.

## ९ वेडा

संध्याकालात आकाशात उगवलेल्या चांदणीच्या प्रेमात एक वेडा गवसला आणि ती प्राप्त करून घेण्यासाठी तो क्षितिजाच्या दिशेने सतत चालत राहिला. वर्षानुवर्षांच्या प्रवासानंतर तो बेपत्ता झाला आणि चांदणी अर्थात होती तेथे व तशीच राहिली. प्रेमासाठी सर्वस्वाचे हवन करणारे ते वेड आपल्याला लाभावे अशी इच्छा कवीने शेवटी व्यक्त केली आहे. येथेही तारका ही प्रेमविषयाचे प्रतीक कवीने मानलेली आहे. अर्थात कोणत्याही अलौकिक व अप्राप्य गोष्टीबाबतही हे प्रतीक सार्थ होऊ शकेल. तीन 'सुनीतां'त लिहिलेली ही कविता नको तेवढी पसरल्यासारखी वाटते.

## १० मुरली

पुरेसा आशयबोध न होताही सहस्रावधी रसिकांनी अतिशय तन्मयतेने गायिलेली ही कविता गडकऱ्यांच्या प्रवाही व प्रभावी शब्दशैलीचा साक्षात्कार घडविणारी आहे. केशवसुतांनी 'मुरली' लिहिली नाही, पण त्यांच्या नंतरच्या काळात नवीन कवींनी मुरली व राधाकृष्णप्रेम ही आपली आवडती स्फूर्तिस्थाने मानली होती. या काळात 'मुरली' वर किती तरी कविता लिहिल्या गेल्या आहेत. पण विशेष गाजल्या आणि रसिकांना काबीज करून गेल्या अशा कविता दोन. एक गोविंदाग्रजांची मुरली आणि दुसरी गोविंदांची. या दोहीचे स्वरूप अर्थात मूलतः भिन्न आहे. गोविंदाग्रजांची मुरली प्रणयाधिष्ठित आहे तर गोविंदांची मुरली राष्ट्रीय स्वातंत्र्याकांक्षेचा जळजळीत उच्चार करणारी आहे, पहिल्या मुरलीतील कृष्ण यमुनेच्या काठी चांदण्यात रासक्रीडा करणारा 'नंदलाल' आहे तर दुसरीतील कृष्ण कालियासर्पाच्या मस्तकावर नाचणारा 'मुरारी' आहे! गडकरी स्वतःला प्रेमाचे शाहीर म्हणवीत. तेव्हा राधाकृष्णातील अद्भुत प्रणयाचे गीत 'मुरली'च्या स्वरांतून त्यांना ऐकू यावे हे साहजिकच होते.

या कवितेला कवीने एक सविस्तर शिर-टीप दिली आहे. 'बी' कवींनी 'चाफा'

ला दिलेल्या टीपेप्रमाणेच ही टीप (तितकी नाही तरी) अंधुकाला अधिक अंधुक करणारी आहे. केशवसुतांच्या व नंतरच्या काळात प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानातील पुरुष-प्रकृती, जीवात्मा-परमात्मा, माया-ब्रह्म इत्यादी परिभाषा आणि तिच्यामागील जिवाशिवाच्या एकतेची कल्पना काव्यक्षेत्रात बरीच रूढ व प्रिय झाली होती. (टागोरांच्या गीतांजलीसारख्या काव्यातही ती प्रकर्षाने व्यक्त झाली होती) राधा-कृष्णाच्या रूपाने जीव व परमात्मा यांच्यांतील परमोच्च भक्तीचे, अंतिम एकतेचे तत्त्वज्ञान काव्याच्या द्वारा मांडण्याची भावना या 'मुरली'च्या मागे आहे यात शंका नाही. परमात्म्याची हाक म्हणजे मुरली आणि त्या मुरलीच्या नादाने वेडावून गेलेली राधा म्हणजे जीवात्मा – एवढेच एक सूत्र कवितेचा रहस्यार्थ शोधताना कवीच्या प्रास्ताविकातून घेतले तरी पुरे आहे.

गडकरी–बालकवी काव्यगायन (जाहीररीत्या) करीत नसत. तरी पण त्यांच्या कित्येक कविता गेयतेशी अपरिहार्यपणाने बांधलेल्या आहेत. गेयता म्हणजे अर्थात कलाकुसरीचे गायन नव्हे. साध्या, सोप्या व लोकगीतांतून रूढ असलेल्या 'चालीं'मधूनच ही गेयता प्रकट होते. गायनकौशल्य तेथे अभिप्रेत नाही. 'राजहंसा' प्रमाणे 'मुरली' ही कविताही प्रवाही चालीमध्ये गाऊनच पाहायला हवी, हा चालीचा ओत्र 'मुरली'त इतका जबरदस्त आहे की, कविता गाताना वा गुणगुणताना प्रवाहपतित ओंडक्या-प्रमाणे आपण अगतिकपणे पुढे जात राहतो. पात्रामध्ये अथवा किनाऱ्यावर काय घडत आहे याचे भानही शिल्लक राहत नाही. हे या कवितेचे सर्वांत मोठे सामर्थ्य आणि म्हटले तर तिचे मोठे वैगुण्यही. शब्द आणि स्वर हे देखील सौंदर्यानुभवाचे विषय असतात. वस्तूप्रमाणे शब्दांनाही स्वभाव व सौंदर्य, कोमलता, कठोरता, कृपणता, उदारता इत्यादी गुणविशेष असतात. ते जाणून, रसिकांचे मन मंत्रांकित करण्याची ताकद असलेला दीर्घ शब्दप्रवाह निर्माण करणे हे गडकऱ्यांसारख्या शब्दप्रभूलाच शक्य असते. आणि हा नुसता शब्दांचा प्रवाह नव्हे. कोशातील मधुर शब्दांच्या मालिकेला आपण काव्य म्हणत नाही. कविता सहज गुणगुणताना आशयांच्या तळाशी जाण्या-इतकी सवड आपल्याला मिळत नाही हे खरे. परंतु शब्दाच्या वेगवान वाऱ्याने प्रवाहित होणाऱ्या वरच्या लहरी-लाटांतूनही प्रणयाचे रसगंध अनावरपणे वाहतात व कवितेच्या

विषयाला अनुकूल असे मदभरी वातावरण निर्माण करतात. जिवाशिवापर्यंत पोचलेच पाहिजे असे नाही. राधामाधवाचे प्रेमही काव्यास्वादाच्या दृष्टीने कमी पडणार नाही.

## ११ हृदयशारदेस

...प्रीतिदेविच्या पायामधला कवि घुंगुरवाळा
...तव वसतीच्या दिशेवरी जी तारा लखलखती
...मूर्तरसाच्या कैक अप्सरा गगनगीत गाती

अशा अनेक रत्नसदृश सुंदर ओळींनी ही कविता खचलेली आहे. कविता आणि प्रणयिनी यांच्यात अनेक कवींनी एकरूपता पाहिलेली आहे. पण शब्दशारदेपेक्षा हृदयशारदा हीच अधिक श्रेष्ठ आहे, किंबहुना हृदयशारदा हीच शब्दशारदेची जन्मदात्री आहे हा या कवितेतील भावार्थ आहे. परंतु हा 'विचार' कवितेत अनुस्यूत असला आणि अनेक सुंदर कल्पनांनी ती बहरलेली असली तरी ती 'अरुणा'प्रमाणे कोठे कोरडी वा कर्कश झालेली नाही. शब्द, भावना, कल्पकता इत्यादींच्या समतोलामुळे कवितेला एक लावण्य प्राप्त झाले आहे.

## १२ हुकमेहुकूम

गडकऱ्यांच्या विनोदी, उपरोधात्मक कवितांतील ही एक उत्तम कविता आहे. काव्याच्या प्रांतातील (किंवा कोणत्याही कलेच्या प्रांतातील) दुय्यम-तिय्यम दर्जाचे व्यवहार कसे 'हुकमेहुकूम' आणि फर्म्यातील रिकामी जागा पाहून चालतात याचे हे खोचक व मनोरंजक वर्णन. शाळाखात्याच्या मंजुरीचा उल्लेख विशेषच मार्मिक आहे.

## १३ घुंगुरवाळा

हे गीत 'पाळण्या'च्या स्वरूपाचे असले तरी त्याचा विषय वात्सल्य हा नसून प्रणय हा आहे. मुलाच्या पायांतील वाळ्याच्या आवाजाने मातेला पहिल्या प्रीतीच्या ब्रह्मानंदाचे स्मरण होते आणि त्या वेळी मनात 'अस्फुट' असलेले गाणे स्वराकार

होत असल्याचा आनंद तिला मिळतो. अनौचित्याचा आक्षेप या कवितेवर घेण्यात आला आहे, पण तो हे बालगीत आहे या गैरसमजुतीमुळे.

## १४ दसरा

केशवसुतांच्या ‘ तुतारी ’ या प्रख्यात कवितेने ‘ दसऱ्या ’ला प्रेरणा दिली आहे यात शंका नाही. किंबहुना अखेरच्या कडव्यात ‘ केशवपुत्राचा सच्चा चेला ’ असा स्वतःचा निर्देश करून कवीनेही त्या बाबतीत कोणाला संशयात ठेवलेले नाही. गडकऱ्यांच्या भाविक वृत्तीमध्ये गुरुभक्तीला आणि गुरुऋणाला मोठेच महत्त्व होते. श्री. कृ. कोल्हटकर आणि केशवसुत हे त्यांचे गुरू. या दोघांपेक्षा त्यांची लोकप्रियता खूप जास्त होती व त्यांच्या लेखनाचे वळणही वेगळे, स्वतंत्र होते. परंतु प्रारंभीच्या काळात ज्यांच्या लेखनाने आपल्याला वाङ्मयाच्या वाटा दाखविल्या, त्यांच्यासंबंधीचा ऋणनिर्देश वारंवार करण्यात त्यांना भूषणच वाटायचे. देवाप्रमाणे काही माणसांवरील श्रद्धा ही गडकऱ्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे एक प्रधान वैशिष्ट्य होते. ‘ सच्चा चेला ’चा हा अर्थ व ही मर्यादा लक्षात घेणे जरूर आहे.

गडकरी केशवसुतांचे शिष्य आहेत याचा अर्थ एवढाच की, आधुनिकी काव्याचा प्रत्ययकारी परिचय त्यांना केशवसुती कवितेतच अधिक झाला. प्रत्यक्षतः केशवसुती काव्याची छाप ज्यांवर पडली आहे अशा थोड्याच कविता त्यांनी लिहिल्या आहेत. अशा कवितांतील ‘ दसरा ’ ही एक कविता. दसरा ‘ तुतारी ’च्याच वृत्तात लिहिलेली आहे आणि ‘ तुतारी ’मधील वैचारिक आशयच थोड्याशा अधिक उपरोधिक स्वरात व्यक्त झाला आहे. ‘ दसऱ्या ’ला तुतारीप्रमाणेच एक ओजवान् प्रवाह आहे आणि तिच्यातील आवेश, उत्साह काही कमी नाहीत. पण नदीचा जिवंत वाहता प्रवाह आणि घाटा-कुंडात घेतलेले तिचे पाणी यांत जो फरक आहे तोच या दोन कवितांत जाणवतो. ‘ तुतारी ’ ही कविता खवळलेल्या वादळासारखी पुढे वाहते. आणि अकस्मात् उंचावर जाऊन ‘ नियमन मनुजासाठी मानव—नसे नियमनासाठी जाणा ’ किंवा ‘ नीतीचे पद जेथे न ढळे—धर्म होतसे तेथेच स्थिर ’ अशा तत्त्वतारकांना सहजतेने धडक मारते. ‘ तुतारी ’तील काही विचारांचा ‘ दसऱ्या ’त फक्त अधिक विस्तार केलेला आहे.

अर्थात या कवितेमागील कवीची भावना अथवा विचारधारा बनावट आहे असे समजण्याचे कारण नाही. ती फारशी प्रबळ नसावी, इतकेच म्हणता येईल. परंतु कविता वाचनीय आणि उत्तेजक आहे यातही वाद नाही.

## १६ ती कोण ?

हे एक सुनीत आहे. इंग्रजीतील सॉनेटच्या धर्तीवर केशवसुतांनी हा चौदा ओळींचा व विशिष्ट यमकरचना असलेला पद्यप्रकार मराठीत रूढ केला होता. शार्दूल-विक्रीडित या दीर्घचरणी वृत्ताचा वापर 'सुनीता'साठी करण्यात आलेला आहे. 'सॉनेट'बाबत पाश्चिमात्य काव्यशास्त्रात बरेच नेमधर्म सांगण्यात आले असले तरी मराठीतील त्याचे स्वरूप बरेचसे सैल व मुख्यतः चौदा ओळींपुरते बांधलेले असेच राहिले. सृष्टीमध्ये सर्वत्र 'जीवबंधन' असताना आपल्याला मात्र 'जी माझ्यास्तव मी जिचे सकलही' अशा व्यक्तीचा आधार नाही ही व्यथा या काव्यात कवीने व्यक्त केली आहे.

## १७ अरुण

केशवसुतांना गडकरी आपले गुरू मानीत तर बालकवींना समकालीनांतील एक श्रेष्ठ कवी म्हणून मान देत. 'दसऱ्या'त तुतारीचे त्याप्रमाणे 'अरुणा'त बालकवींच्या 'अरुणा'चे प्रतिबिंब उमटले आहे. परंतु बालकवींच्या 'अरुणा'तील एकात्मता, निर्मळ आनंदाचा उद्रेक व हृदयंगमता हे गुण गडकऱ्यांच्या प्रस्तुत कवितेत आढळत नाहीत. कल्पकता हा गडकरी काव्याचा एक प्रधान विशेष आहे. पण कोणत्याही प्रति-क्रियेच्या उत्कट अनुभवाशी कल्पकतेची सांगड बसली तरच ती हृद्य आणि काव्या-स्वादास पोषक होते. एरव्ही ती कर्कश व केवळ चमत्कृतिजनक वाटते. असा काहीसा प्रकार या कवितेत झाला आहे. अरुणाच्या सौंदर्यानुभवाचे दर्शन न घडविता कविता एकदमच उत्प्रेक्षा रूपकांच्या मालिकेत प्रवेश करते. काही कल्पना अर्थात् मनोहर आहेत, पण तेथेच कवितेची आस्वाद्यता संपते.

## १९ भीमकबाळा

ही कविता म्हणजे एक नाट्यगीत आहे. नाट्यगीताला आवश्यक असा सरळ साधा आविष्कार आणि हृदयाला चटकन स्पर्श करणारी उत्कटता हे या गीताचे गुण-विशेष आहेत. त्या गुणांमुळे ही कविता तिच्या मर्यादेत सुंदर वाटते. ‘ माझी एवढीच कविता मला आवडते ’ हे कवींचे उद्‌गार परमार्थाने घेण्याचे कारण नाही. गडकऱ्यांच्या सर्वोत्तम कवितांशी तिची बरोबरी होणार नाही.

## २० ओसाड आडातील एकच फूल

स्वतःच्या प्रतिबिंबावर प्रेम करणाऱ्या एका फुलाची ही कहाणी. निर्जनातील एका ओसाड आडामध्ये हे फूल आहे. अंधाराच्या लहानशा जगात राहणारे ते गोजिर-वाणे फूल पाण्यातील आपले चित्र पाहते आणि त्याच्या प्रेमात पडते.

जो तो या जगतावरी पसरतो
छाया मनाची सदा

शहाणी माणसेही अखेरी स्वतःच्या पडछायेवर जगत असतात. मग हे तर एक छोटे दुर्लक्षित फूल! प्रतिबिंबावर प्रेम करता करता ते फूल त्याचे चुंबन घेण्यासाठी पाण्यात वाकते आणि त्यातच नाश पावते.

प्रेमाशिवाय जीवनाला अर्थ नाही आणि हे प्रेम म्हणजे अखेरतः स्वतःच्या भाववृत्तीचे प्रतिबिंब दुसऱ्या कोणात पाहणे, या कल्पनेभोवती ही कविता उभारलेली दिसते. प्रेमविषयाशी होणारी अखेरची एकात्मताच दोघांच्याही नाशाला कारणीभूत होते असा निष्कर्ष शेवटी काढण्यात आला आहे.

पण हा अंतर्गत अर्थ बाजूला ठेवला आणि एका फुलाची कथा म्हणून ही कविता वाचली तरी ती हृद्य वाटते. आडाचे ओसाडपण, तेथील भकास अंधेरे वातावरण, फुलाचे प्रेमकारण, त्याचा शेवट, इत्यादी गोष्टी कवीने चित्रात्मक शैलीने डोळ्यांसमोर उभ्या केल्या आहेत.

पाच सुनीतांच्या द्वारा ही कहाणी सांगण्यात आली आहे. कथा-काव्यासाठी

(छोट्या का होईना) सुनीताचा उपयोग गडकऱ्यांनीच प्रथमतः केलेला असावा. रचनेचे हे वैशिष्ट्य लक्षात घेण्यासारखे आहे.

## २२ फुले वेचली पण–

एकाकी प्रेमशून्य अंतःकरणाला जीवनातील आनंदाचा व सौंदर्याचा उपभोग घेता येत नाही, सुख देण्याऐवजी त्याला वेदना देण्यास मात्र ती कारण होतात. विविध रंगांची सुवासिक फुले कवीने पन्हाळगडच्या पठारावर वेचली. पण रूपगंधाने शिगोशीग भरलेली फुलवंती कोणाला अर्पण करायची? आपल्या एकाकी निष्प्रेम जीवनाची काळजात सूळ शिरल्याप्रमाणे त्याला तीव्र जाणीव होते.

काट्यांवरि या कोमल हृदया टाकुनि देवा क्रूर।
कुठे फुलांची धनीण माझ्या दिली दवडुनी दूर ॥

शेवटी 'ब्रह्मार्पणमस्तु' म्हणून तोही फुले फेकून देतो, देवाची परत देवाला देऊन टाकतो – एकटेपणाची, निष्प्रेमाच्या वेदनेची सल गडकऱ्यांच्या काव्यात जागोजाग व्यक्त झाली आहे. या कवितेतील तिचा आविष्कार हृदयस्पर्शी आहे. अशा अपूर्व, चौरस प्रतिभाविलासाच्या मागे एकाकीपणाचा हा अंगार पेटलेला असावा, हा विचार सहृदय वाचकास खिन्न वाटणारा आहे.

शेवटच्या चरणात 'रसिकां'चा उल्लेख आहे. गडकऱ्यांच्या अनेक कवितांतून शेवटच्या कडव्यात स्वतःचा नामोल्लेख आणि रसिकांशी केलेले एखादे हितगुज या गोष्टी आढळून येतात. तुका म्हणे, नामा म्हणे, यांसारख्या प्राचीन काव्यातील आत्मोल्लेखाचे हे अनुकरण असावे. रसिकाच्या निर्देशावरून या कविता रसिकाला डोळ्यासमोर ठेवून लिहिल्या आहेत असे समजायचे कारण नाही. लेखनाची ही एक 'लकब' आहे एवढेच.

## २३ पुनर्विकसन

सृष्टीमध्ये सर्वत्र पुनर्विकसन आहे. सूर्य मावळतो व पुन्हा उगवतो. कलेकलेने क्षीण होत जाणारा चंद्र शुक्ल पक्षात पुन्हा विकसित होऊ लागतो. वसंतात वनश्री पुन्हा

बहरते आणि वर्षाकालात विजेला पुनर्जन्म मिळतो. हे ‘ नवविकसन ’ सर्व सृष्टीत होत असताना ‘ माझे चिरनिराश जीवन्मृत मन कायमचेच कोमेजलेले का ? ’ असा प्रश्न कवीने देवाला विचारलेला आहे. शेवटच्या चरणातील या व्यक्तिगत व दुःखार्त प्रश्नाने तोवर सामान्य वाटणाऱ्या कवितेला एकदम वेगळ्या पातळीवर नेले आहे.

## २४ हालत्या पिंपळपानास

ही कविता म्हणजे कल्पकतेचा एक विलास आहे. खिडकीसमोरील पिंपळाचे एक पान वाऱ्यावर सारखे फडफडताना पाहून कवीच्या मनात उमटलेल्या कल्पनालहरी येथे शब्दांकित करण्यात आल्या आहेत. केशवसुतांच्या ‘ म्हातारी ’ मध्ये ‘ म्हातारी ’ वर रचलेला तत्त्वज्ञानाचा बोजा जास्त व ओढाताणीचा वाटतो. तसाच काही प्रकार याही कवितेत झालेला आहे. विशिष्ट विचारांचा ध्यास घेतलेले या अर्थाने गडकरी तत्त्ववेत्ते नाहीत. परंतु जीविताच्या मुळाशी असलेल्या प्रश्नापर्यंत जाण्याची, तेथे त्यातील संवाद-विसंवादांचा शोध घेण्याची वृत्ती त्यांच्या कवितेत अनेक ठिकाणी प्रकट झाली आहे. ‘ पिंपळपाना ’तही ‘ हे अवश्य जग चालाया का असे ? ’ या विचारापर्यंत ते येतात. शेवटी नवबालेच्या केशकलापातील पिंपळपानाशी (एक सोन्याचा केशालंकार) झाडावरच्या पिंपळपानाचा जो संबंध जोडला आहे तो केवळ शाब्दिक कोटीच्या स्वरूपाचा असल्यामुळे फारसा काव्योचित वाटत नाही.

## २६ मागे पाहणे

## २८ गीत-विरक्ति

आपल्या वाटेकडे आर्द्र नजरेने पाहणारे माणूस मागे कोठल्या दारात उभे नसेल तर मागे पाहायचेच कशाला ? बेबंदपणाने सारखी, जमेल तशी वाटचाल करीत राहावे हेच योग्य.

कविता छोटी असली तरी निष्प्रेमाच्या वेदनेचे स्वरूप यथार्थतेने प्रगट करणारी आहे.

‘ गीत-विरक्ति ’ या कवितेत हीच भावना ‘ देवी ’चा उल्लेख करून व्यक्त होते. कवितेचा गूढार्थ इतरांना का उमगत नाही हेही सांगितले आहे.

## ३१ त्याच तारकेस याचना

प्रेयसीच्या संबंधात तारकेचे रूपक गोविंदाग्रजांना विशेष प्रिय होते. तारकेच्या रूपाने जाणवणाऱ्या प्रेयसीचे निर्देश त्यांच्या काव्यात अनेक ठिकाणी आहेत. येथे संपूर्ण कविताच त्या रूपकाच्या अनुरोधाने लिहिली आहे. तारका ही आकाशात म्हणजे स्वर्गात आहे. आपल्या किरणजालाने ती कवीला मोहित करीत आहे, त्याला आपल्यामागे वरती ओढीत आहे. पण दोघातील अंतर कायम राहत असल्यामुळे प्रियकराच्या हृदयाची होणारी तगमग कवितेत सरळ पण उत्कट शब्दांत व्यक्त झाली आहे.

## ३३ एका जुन्या श्लोकाची आठवण

लहानपणी शालेय पुस्तकात वाचलेल्या एका श्लोकावर कवीच्या प्रौढ वयाने केलेले हे एक मार्मिक भाष्य आहे. ‘ अहो हरपली ती ईश्वराची दया ’ या शब्दांनी कवितेला झालेला करुणाचा ओझरता स्पर्श आकर्षक वाटतो. शेवटच्या दोन ओळीं मात्र कवितेतून अपरिहार्यपणे निघाल्यासारख्या वाटत नाहीत. कविता ‘ सुनीत ’ आहे आणि चांगल्या सुनीताचे हे एक उदाहरण आहे.

## ३४ निर्वाणीची विनवणी

या कवितेतील निर्वाणीची भावना ध्यानात येते, पण काव्य जाणवत नाही. कोणत्याही गोष्टीसंबंधीची नुसती उत्कटता वा व्याकुळता चांगल्या कवितेला जन्म देत नाही, हृदयंगम स्वरूपात तिचे उन्नयन व्हावे लागते. तसे येथे झाले नसल्याने कविता प्रत्ययकारी वाटत नाही.

## ३५ हृदयास

प्रेमभंगातून केव्हा निराशाच नव्हे तर उद्वेग आणि चीडही उत्पन्न होते.

अशीच प्रतिक्रिया या कवितेतून तीव्रपणाने प्रकट झाली आहे. प्रेयसीजवळ फक्त नटवे सौंदर्य असते, पुरुषाला आपल्याकडे ओढणारे शारीरिक आकर्षण असते. प्रज्ञा, प्रतिभा, ज्ञान अथवा व्यापक समजत यांसारख्या मानसिक गुणांचा लवलेशही नसता ती प्रियकराला केवळ शरीरसौंदर्याच्या आयुधाने जखमी करत व हुलकावण्या दाखवून अखेर त्याला निराशेच्या खाईत लोटून देते. अशा अवस्थेत, एका 'नकली' प्रेताच्या प्राप्तीसाठी आपण आपली श्रेष्ठता विसरून एका 'कमअस्सल' बाहुलीच्या पायाशी किती लाचार झालो याची तापदायक जाणीव कवीला होते. ती तितक्याच तीव्र, कडकडीत शब्दांत येथे व्यक्त होते.

## ३६ एका शब्दासाठी विनंती

'होय' या एका शब्दासाठी प्रियकराने प्रियेला केलेली ही विनंती आहे. शेवटच्या चरणात या शब्दाची जागा रिकामी सोडून कवीने सुंदर नाट्यही साधले आहे.

दोघांच्या परस्परप्रेमाची एकमेकांना साक्ष पटली आहे. परंतु अनावर स्वभाव-दोषांमुळे दोघेही परस्परांना दुखावतात, जखमी करतात. 'जीवाच्या बागेत खेळतो' या कडव्यातील सुंदर, चित्रात्मक प्रतिमेने कवीने ही अवस्था शब्दांकित केली आहे. 'हृदयास' प्रमाणे ही कविताही कवीच्या अंतःकरणाचा तुकडा घेऊन बाहेर अवतरली आहे असे वाटते.

## ३५ प्रेम आणि मरण

गडकऱ्यांच्या प्रतिभेचा परिणत व सर्वोच्च आविष्कार ज्या कलाकृतींतून पाहण्यास मिळतो त्यात 'प्रेम आणि मरण' या कवितेची गणना करावयास हवी. कवितेच्या आटोपशीर आकारात प्रकट झालेले एक छोटे महाकाव्य असेच या कवितेचे वर्णन करावे लागेल.

कवितेचे स्वरूप कथात्मक आहे. एका वृक्षाचे प्रेम मेघात तळपणाऱ्या विजेवर जडते, तिच्या प्राप्तीसाठी तो घोर तपश्चर्या करतो आणि अखेर तिची 'जळती' भेट

होताच त्याच क्षणी आनंदाने उन्मळून पडतो, एवढीच ही कथा आहे. पण जमिनीवरील 'दीड वितीच्या दुनिये'पासून आकाशातील 'चंचल बाले'पर्यंत सर्वच दृश्ये कवीच्या प्रतिभासामर्थ्याने विलक्षण प्रभावी व जिवंत केली आहेत. इतकी की, मानवी जगातील एक प्रेमकहाणीच आपण वाचतो आहोत असे आपल्याला वाटते. पौराणिक कथेच्या वातावरणामुळे कवितेच्या आस्वाद्यतेत मोठीच भर पडलेली आहे. शब्दांच्या द्वारा चित्र उभे करण्याचे कवीचे सामर्थ्यही येथे अनेक ठिकाणी प्रत्ययास येते. प्रेमासाठी सर्वस्व पणाला लावणारा तो वृक्ष तर रंगमंचावरील एखाद्या धीरोदात्त नायकासारखाच आपल्या डोळ्यांसमोर साक्षात् उभा राहतो.

प्रेमाचे आदर्श, मृत्यूला आनंदाने सामोरे जाणारे रूप गडकऱ्यांना प्रिय होते. तेव्हाच्या सर्वच काव्यात प्रेमासंबंधीची ही कल्पना रूढ होती. 'प्रीति हवी तर जीव आधि कर अपुला कुरबान' असे उद्‌गार बालकवींनी काढलेले आहेत. केशवसुतांच्या काळापासून या आदर्श, आत्मिक प्रेमाची धुंद मराठी कवितेत प्रकट होऊ लागली. निष्ठेवर व समर्पणावर आधारलेल्या या प्रेमकल्पनेत बलिदानालाही महत्त्व होते. ज्योतीवर झेप घेऊन आत्माहुती देणारा पतंग या प्रेमाचे प्रतीक होता. प्रेमाच्या सफलतेसाठी (अथवा ते सफल होत नसले तरीही) प्राणाची कुर्बानी करण्याइतकी उत्कटता त्यात गृहीत धरलेली होती. आजच्या काळातील प्रेमविचार (काव्यादी साहित्यात आविष्कृत होणारा) या भूमिकेपासून काहीसा दूर गेला असला तरी गडकऱ्यांच्या काळात ते एक भावनात्मक वास्तव होते हे लक्षात घ्यायला हवे. केवळ आपल्याकडेच नव्हे तर तेव्हाच्या पाश्चिमात्य काव्यातही. आणि या भाववास्तवाचा इतका सुंदर आविष्कार तिकडच्या काव्यातही झाला असेल की नाही याची शंका वाटते.

## ३८ काही इंग्रजी कविता वाचून

इंग्रजी भाषेतील उत्तमोत्तम काव्ये वाचून समकालीन मराठी कवितेचे 'दारिद्र्य' कवीला तीव्रतेने जाणवते. आणि त्या दारिद्र्यापेक्षा, आपण काही तरी अलौकिक निर्मिती करीत आहोत हा कवीचा वृथा अभिमान त्याला अधिक खेदजनक वाटतो. हा विचार अतिशय बोचक आणि उपरोधात्मक शब्दांत या कवितेत मांडला आहे.

गडकरी-बालकवींच्या काळात आपल्या अलौकिकत्वाचे स्तोम सामान्यच काय पण अतिसामान्य कवीही माजवीत असत. त्या संदर्भात गडकऱ्यांसारख्या प्रखर बुद्धिमान लेखकाची अशी प्रतिक्रिया होणे स्वाभाविक होते. या कवितेतील बालकवींचा गौरवोल्लेख लक्षात घेण्यासारखा आहे. गवताप्रमाणे उदंड वाढलेल्या काव्याच्या गुणहीन विस्तारामध्ये केवळ बालकवीची कविता पाहून आपल्याला धीर वाटतो असे कवीने सांगितले आहे. समकालीनांबाबत मत्सराची वा उदासीनतेची वृत्ती लेखकांच्या जगात नित्याचीच असते. गडकऱ्यांच्या रसिकतेचे हे मोठेपण व औदार्य दुर्मिळच समजायला हवे.

## ३९ निर्दय बालेस

## ४० शेवटचे प्रेमगीत

'निर्दय बालेस' ही 'अपूर्ण' कविता असफल प्रेमाची व्यथा व्यक्त करणारी आहे.

केल्या ज्याच्या पायघड्या मी तुझ्या पावलांसाठी
त्या हृदयाला तुडवुनि गेलिस नटव्या थाटापाठी

अशा अनेक सुंदर ओळी देणारी ही कविता कवीची अनेक ठिकाणी प्रकट होणारी प्रेमनिराशाच तीव्रतेने शब्दबद्ध करीत आहे. कवितेखाली 'अपूर्ण' म्हटले असले तरी तशी ती वाटत नाही. 'ज्या देवाने जग हे केले' येथपासून विफलतेचा सूर उद्वेगाकडे वळलेला आहे. 'शेवटच्या प्रेमगीता'तील भावना अशाच आशयाची आहे. पण तिचा आविष्कार तितका मनोरम नाही.

## ४१ कधी

ज्या घडाव्याशा वाटतात पण घडत नाहीत अशा अनेक गोष्टी 'कधी'ने प्रश्नांकित झालेल्या असतात. अशा काही 'कधीं'ची ही मालिका आहे. अंतःकरणात रात्री आकारणारी स्वप्नसृष्टी प्रत्यक्षात कधी उतरत नाही – हे त्यातील महत्त्वाचे शल्य.

## ४२ इच्छा, उपभोग व विषय

एखादा सुखानुभव काबीज करण्यासाठी केलेली जवळीक त्या सुखाला ग्रहण लावण्यासच कारणीभूत होते ही कल्पना वेगवेगळ्या रूपकांच्या द्वारे येथे मांडली आहे. रूपके फारशी समर्पक नाहीत.

## ४३ जीवितास

इतर कवितांच्या मानाने क्लिष्ट वाटणारी ही कविता कवीच्या अंतःकरणात घर करणारा निराशेचा विचार सांगणारी आहे. विचारावरती उभारणी झाल्यामुळेच कवितेत कदाचित क्लिष्टता आली असेल. मानवी जीवन म्हणजे दोन क्षणांची एक अखंड साखळी. एक क्षण आशा उत्पन्न होण्याचा आणि दुसरा क्षण ती उद्ध्वस्त होण्याचा. जीवनापासून माणसाला एवढाच लाभ व्हावा का – असा प्रश्न कवीच्या मनात निर्माण होतो.

## ४४ तीन तरी

कोण, कसे आणि कधी यांना जोडून येणारे ' तरी ' म्हणजे ' तीन तरी. ' कोणत्याही ' तरी 'च्या, म्हणजे अनिष्ट घटनेच्या पाठोपाठ हे तीन तरी येतात व त्याच्या अंतिमतेवर अखेरचे शिक्कामोर्तब करतात. अशा अनिष्टाचा, आशाभंगाचा एकेक दृष्टान्त एकेक कडव्यात दिलेला आहे. घडू नये ते घडून गेल्यावर ते कोणालाही, कसेही आणि केव्हाही पुन्हा नव्याने घडवता येत नाही. नियतीला शरण जाणारी अगतिकता गोविंदाग्रजांच्या कवितेत कित्येक ठिकाणी प्रकट झाली आहे. अशा कवितांतील ही एक. परंतु कविता कल्पकतेच्या पातळीवरच राहते.

## ४५ चिंतातुर जन्तु

कवीच्या मिष्किल आणि फटकळ स्वभावाचे दर्शन या कवितेत आपल्याला घडते. या कवितेतील धार विनोदापेक्षा उपरोधाचीच अधिक आहे. कोणत्याही गोष्टी-

बाबत बसल्या बैठकीवरून अकारण चिंता व संशय प्रकट करणाऱ्या चिंतातुर्‍यांना हा आहेर दिला आहे. स्वतः हातपाय न हलविता घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीसंबंधी वाकडी-तिकडी शंका व्यक्त करणारी माणसे डोकी उठवतात. त्यांना योग्य अशी उत्तरे कवितेत दिली असून अखेरी त्यांना मुक्ती देण्यासाठी देवाची प्रार्थना केली आहे. 'चिंतातुर जन्तू' या शब्दांतलाच प्रहार-मर्मभेदक आहे.

## ४६ फूल ना फुलाची पाकळी

ही कविताही कवीच्या मनातील एका विचाराचे काव्यमय दर्शन घडविणारी आहे.

दूषण वगळुनि भूषणमात्रे
प्रभुपूजन करि काळ असे

हा तो विचार होय. कोणत्याही कलाकृतीच्या अथवा कर्तृत्वाच्या मागे जे वाईट असते ते काळाबरोबर वाहून जाते. त्या कलेचे सौंदर्य अथवा त्या कर्तृत्वाचे यश पुढील काळाकडून कृतज्ञतेने स्वीकारले जाते. त्यामध्ये ते 'वाईट' आड येऊ शकत नाही. कलावंतांच्या अथवा नेत्यांच्या कार्याकडे दुर्लक्ष करून त्यांच्या चारित्र्याचेच उत्खनन करणाऱ्या लोकांना उद्देशून ही कविता लिहिली आहे. हे कार्य ती चांगल्या प्रकारे पार पाडते.

## ४७ एक समस्या

बोलघेवड्या सुधारकांना मारलेला हा झणझणीत तडाखा. गडकऱ्यांच्या काळात सामाजिक सुधारणेचा वाद सर्वत्र पेटलेला होता. यातील कित्येक 'बोलूकाकां'चा सुधारणावाद नकली आणि उथळ असे. सुंदर विधवेच्या तोंडाकडे पाहूनच ज्यांना सुधारणेची आठवण होते अशा वावदूक सुधारकांचे हे व्यंगचित्र, कवीच्या उपरोधिक शैलीचा एक चांगला नमुना आहे.

### ४८ फणसाचे पान

### ४९ जुन्या कवितांची आठवण

या दोन्ही कविता पूर्वायुष्यात कोणावर तरी केलेल्या उत्कट प्रेमाचे स्मरण करणाऱ्या आहेत. पहिली आठवण फणसाच्या पानाशी तर दुसरी पूर्वी केलेल्या कवितांशी व विशिष्ट स्थळाशी बांधलेली आहे. कवीचे भावचरित्र समजून घेण्यापुरतीच ही काव्ये महत्त्वाची.

### ५३ हुरहूर

सर्व वातावरण हवेने भरलेले असले तरी माणूस फक्त श्वासापुरता त्या हवेचा धनी असतो. पुष्कळ उपलब्ध असूनही माणसाला त्यातील फार थोडे प्राप्त होते. अशा अनेक उणीवांनी व अपूर्णतांनी माणसाचे आयुष्य काजळलेले असते. त्यातून पूर्णतेकडे जाण्याची हुरहूर सतत त्यास वाटत असते. ती या कवितेचा विषय होय. कविता ‘ सुनीत ’ आहे.

### ५५ सुख-दुःख

‘ जीवितास ’ प्रमाणे हीही एक तात्त्विक कविता आहे. संसारामध्ये सुख असते आणि दुःखही असते. आपल्या वाट्याला सुखच यावे असा सामान्यांचा अट्टाहास असतो. जे अधिक विचारी आहेत ते सुख-दुःखात समानता मानतात. परंतु सुख-दुःखातून निवड करायची झाली तर दुःख हेच सुखाहून अधिक श्रेष्ठ आणि स्वीकारार्ह ठरेल असा विचार कवीने येथे मांडला असून पुढील भागात त्याचे समर्थन केले आहे. हे समर्थन आत्मापरमात्माच्या वेदान्तात शिरल्यावर बोजड होते आणि काव्यापासून दूरही जाते. ‘ सुख निजभोगी, नरा गुंगवी ’ या दोन ओळींतच समर्थनाचा सर्वोत्तम भाग आलेला आहे.

## ५६ / अवेळी ओरडणाऱ्या कोकिळेस

मध्यरात्रीच्या अंधारात, झोपेला पारख्या असलेल्या कवीच्या कानांवर कोकिळेचे कूजन पडते. निराशेने खचलेल्या आणि सांसारिक आघातांनी जखमी झालेल्या कवीच्या अंतःकरणावर ते कूजन अमृतासारखे झिरपते.

हाती संसाराची माती
मनिच्या आशा मनास खाती

अशा व्याकुल मनाला त्या स्वरांचा स्पर्श संजीवक वाटतो. आणि 'अवेळ तरिही बोल'–अशी त्या अदृश्यातील कोकिळेची विनवणी कवी करतो.

कवितेची सुरुवात रात्रीच्या वर्णनाने झाली आहे. आकाशात चंद्राची कोर असली तरी त्या मलूल चांदण्याने सृष्टीतील उल्हास नव्हे तर खिन्नताच वाढवली आहे. अर्थात कवीचे मन हेच या खिन्नतेचे जन्मस्थान आहे. पुढील काही कडव्यांत कोकिळेच्या अवेळी गाण्याचे समर्थन आहे. एरव्ही सकाळी किंवा दिवसा गाणारी कोकिळा केव्हा तरी अचानक मध्यरात्री वा पहाटे गाऊ लागते. रात्रीच्या स्तब्धतेवर आर्त स्वरांचे आलेख कोरणारे तिचे मधुर कूजन सर्वसामान्यांच्या अंतःकरणासदेखील मोहिनीमंत्राप्रमाणे वेढून टाकते. काळोखाच्या ओट्यावर अंतस्थ वेदनांची ओझी मोकळी करणाऱ्या कविमनाला तर त्यात अमृताचे सांत्वन सापडावे यात नवल नाही. शेवटच्या पाचसहा कडव्यांत कवीने आपली हृदयस्थ व्यथा सूचक शब्दांत आणि तरीही उत्कटपणाने व्यक्त केली आहे. 'पाहुनि ही तव दयाशीलता' या कडव्यातील सहानुभूतीची याचना दुबळी वाटली तरी प्रामाणिक आहे.

आपल्या नाटकांतून सुंदर शब्दांची मयसभा बांधणारे गडकरी आपल्या अनेक उत्तम कवितांमध्ये अकृत्रिम व नितळ शैलीचा श्रेष्ठ साक्षात्कार घडवितात. ही कविता अशा कवितांमधील एक सर्वांगसुंदर कविता आहे. सुरुवातीपासून शेवटापर्यंत ती कवीच्या अंतःकरणापासून, त्याच्या अनुभवापासून दूर जात नाही. अफाट कल्पकता आणि मनोहर शब्दप्रवाहात रमून जाण्याची वृत्ती, ही कवीची प्रतिभासामर्थ्ये देखील त्याच्या एकाकीपणाला, त्याच्या प्रेमहीनतेच्या व्यथेला वाट करून देण्यासाठी बाजूला उभी राहिली आहेत असे वाटते. सर्व कविता त्या अस्पष्ट वेदनेच्या अंधुक, विषण्ण अंधाराने

भरून गेली आहे. मराठीतील फार थोडी भावकाव्ये 'कोकिळे'च्या जवळपास येऊ शकतील.

## ५८ प्रेमाखातर

कवितेची भूमिका कवीनेच आपल्या प्रस्तावटीपेत विशद केली आहे. अधून-मधून कविता गंभीराच्या कक्षेत जात असली तरी ती खेळकरपणानेच लिहिली आहे असे दिसते. 'नव्या दमाचा, नव्या जगाचा' या पुनरुक्त ओळीवरून, केशवसुतांच्या 'शिपाई'चे विडंबन करण्याची कल्पनाही कदाचित् कवितेच्या मागे असावी असे वाटते.

## ५९ लांडोर

मोर नाचतो म्हणून लांडोरही नाचते. मोराचा डौल अथवा त्याचा सुंदर पिसारा तिच्याजवळ नसतो. तिचा नाच म्हणजे मोराच्या मनोहर कलापूर्ण नृत्याचे केवळ विडंबन असते. आपल्या वैगुण्याची जाण नसलेल्या 'लांडोरी' जीवनाच्या विविध क्षेत्रात अशाच सतत नाचत राहतात आणि शिरजोर बनून मोरावरही मात करू पाहतात. एका अस्सलाच्या भोवती त्याच्या शंभर कमअस्सल नकलांचा गराडा पडतो आणि त्या नकला अखेर अस्सलालाही गारद करून टाकतात. सर्वच जीवन-प्रांतात येणारा हा अनुभव पाहून 'तो मोर नको अन् ती लांडोरही नको' असा वैताग कवीच्या मनात उत्पन्न होतो.

## ६० गोड निराशा

'पहिले चुंबन', 'गुलाबी कोडे' या कवितांच्या वर्गातीलच ही कविता आहे. 'कळ्यावाचुनी फुललेले' आणि 'काट्यांच्या त्रासा चुकलो' असे प्रेयसीच्या गालावरील गुलाब 'श्वासाने हृदयी भरण्याचा' प्रयत्न असफल होतो. हीच गोड निराशा. कवीच्या कल्पकतेचा एक मनोहर विलास या शृंगारिक कवितेत प्रकट होतो.

हे ' भुतांचे गाणे ' म्हणजे खरोखरी माणसांचे अथवा माणसांविषयीचेच गाणे आहे. मध्यरात्रीच्या भयाण एकांतात भुतांनी स्मशानामध्ये गायिलेले हे गाणे आमच्या समाजातील मानवी जीवनावर अत्यंत प्रखर आणि उपरोधिक असे भाष्य करते. केशवसुत-गडकऱ्यांच्या काळात सुधारणावाद आणि परंपरावाद यांच्यातील झगडा अतिशय तीव्र व व्यापक स्वरूपाचा होता. समाजजीवनातील वैचारिक संग्रामाचे ते प्रमुख रणक्षेत्र होते. प्रत्येक जाणता माणूस कोणत्या ना कोणत्या बाजूने या झगड्यात गुंतलेला होता. हजारो वर्षांच्या परंपरा झुगारून नव्या युगाच्या जाणीवांना सामोरे जायचे की त्या परंपरांची तटबंदी पक्की करून आधुनिकतेच्या आक्रमणाचे पारिपत्य करायचे, हा या द्वंद्वातील प्रमुख प्रश्न होता, आणि त्या प्रश्नाभोवती सर्वत्र पानिपत निर्माण झाले होते. त्या काळातील कवींचे व ललित लेखकांचे संवेदनशील मन या झगड्यामध्ये ओढले गेले नसते तर तेच आश्चर्य मानावे लागले असते. समाजात पेटलेल्या या वैचारिक वणव्याच्या ज्वाला व ठिणग्या तेव्हाच्या सर्वच साहित्यात प्रकट-लेल्या दिसतात. केशवसुतांच्या तुतारी, नवा शिपाई, स्फूर्ती इत्यादी कविता म्हणजे या रणयज्ञासाठी गायिलेल्या तेजस्वी ऋचाच होत्या. गडकऱ्यांनीही हा सुधारणावादाचा पक्ष निदान विचाराने तरी स्वीकारला होता.

' निदान ' म्हणायचे कारण केशवसुतांचे मानसिक परिवर्तन जितके कठोर, कणखर आणि तडजोड नाकारणारे वाटते तितके गडकऱ्यांचे वाटत नाही. वैचारिक परिवर्तन माणसाच्या व्यक्तिमत्त्वात म्हणजेच त्याच्या भाववृत्तीत नेहमी रुजतेच असे नाही. ही जी विचारभावनेची एकात्मता केशवसुतांत दिसते ती निदान तितक्या प्रमाणात गडकरी व बालकवी यांच्यांत आढळत नाही. बहुधा त्याचमुळे गडकरी–बालकवींच्या दसरा व धर्मवीर या कविता ' तुतारी 'च्या पातळीवर जात असलेल्या दिसत नाहीत.पण दसऱ्याची उणीव ' स्मशानातील गाणे ' मध्ये भरून निघाली आहे. उपरोध हे गडकऱ्यांच्या प्रतिभेचे एक सामर्थ्यशाली अंग होते. ' दसरा 'मधील आवेशात व परिवर्तनाच्या भावात्मक आविष्कारात काहीशी अडखळणारी कवीची प्रतिमा या कवितेत आपल्या खास बलकेंद्रामध्ये आली आहे. ' काय असायला हवे ' हे सांगण्याचा

केशवसुती प्रखरपणा गडकऱ्यांजवळ नसला तरी 'जे आहे' त्यावर हल्ला चढवताना त्यांच्या कलमाला या कवितेत जी धार चढते ती मराठी काव्यात अन्यत्र कोठे सापडणे कठीणच. भयानकाच्या प्रस्तावातून तीव्र उपरोधात शिरणारी ही कविता या विशिष्ट क्षेत्रात अजोडच आहे.

## ६२ घुबडास

भयानकाचे गडकऱ्यांना खास आकर्षण होते. स्मशान, मध्यरात्र, पिशाच्चे इत्यादिकांचे स्वतंत्र व एकत्रित निर्देश त्यांच्या लेखनातून अनेकदा आले आहेत. 'घुबडास' ही कविताही या आकर्षणाची व त्यामागे असलेल्या निराश वृत्तीची निदर्शक आहे. केशवसुतांनी एका इंग्रजी कवितेवरून 'घुबड' ही कविता लिहिली आहे. तिच्यापेक्षा ही आशयाने भिन्न आणि अधिक काव्यपूर्ण असली तरी या कवितेला केशवसुतांच्या घुबडानेच प्रेरणा दिली असावी असा वृत्तरचनेवरून कयास करता येतो.

घुबड हा रात्रीच्या वेळी, स्मशानासारख्या ओसाड ठिकाणी घूत्कार करणारा पक्षी. जगातील व्यवहाराला विटलेल्या व वैतागलेल्या मनाला तो आपला सहधर्मी सांगाती व गुरू वाटतो. घुबडाच्या भोवतालचे वातावरण 'स्मशानातील गाण्या'प्रमाणे येथेही गर्द रंगात उभे केले आहे. एक प्रकारच्या काळोखी नशेत कविता कडव्यामागून कडवे ओलांडीत जाते. अधूनमधून 'वरती नभ हे' यासारख्या भयानकाची साथ करणाऱ्या चमकदार कल्पना लखलखून जातात. केव्हा 'खरे न कोणा कधीच दिसते' यासारख्या तत्त्वज्ञानाच्या लडीही उलगडतात. केव्हा 'पृथ्वीचे नारिंग...' यांसारखा अमनोहर कल्पनाविलास प्रवाहात व्यत्ययही आणतो. कविप्रतिभेच्या काही सामर्थ्यांचा आणि तिला पडणाऱ्या काही मोहांचा विचित्र संगम या कवितेत झाला आहे. 'मुरली' सारखा सामर्थ्यवान् प्रवाह नसल्यामुळे तिचा विस्तारही अवास्तव वाटतो.

## ६३ श्री महाराष्ट्रगीत

गडकरी हे वृत्तीने भाविक होते. कित्येक गोष्टींसंबंधी त्यांना वाटणारा भक्तिभाव

केवळ असीम होता. या गोष्टीत महाराष्ट्र आणि मराठी इतिहास यांचा प्रामुख्याने अंतर्भाव होता. त्यांची महाराष्ट्राविषयीची ही भक्ती प्रस्तुत महाराष्ट्रगीतात मनोहर रूपाने प्रगट झाली आहे. महाराष्ट्रातील श्रेष्ठांच्या चरित्रावर, त्यातील जातिजमातींच्या स्वभावावर, त्याच्या सांस्कृतिक वैशिष्ट्यावर, एवढेच नव्हे तर त्याच्या झाडाझुडपांवर आणि दगडधोंड्यावरही त्यांनी येथे सुंदरतेचा साज चढवला आहे. गीतातील अनेक ओळी सदैव स्मरणात राहण्यासारख्या आहेत. अलीकडच्या काळात बरेच प्रचारात आलेले श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे महाराष्ट्रगीत, या कवितेच्या मानाने किती प्राथमिक व फिके आहे हे सहज लक्षात येईल. सभा समारंभात रूढ होण्याच्या दृष्टीने या गीतात काही अडचणी असतील अथवा आहेतही. पण इतके चांगले महाराष्ट्रगीत दुसऱ्या कोणी कवीने लिहिले आहे असे वाटत नाही. महाराष्ट्रासंबंधीचा भक्तिभाव येथे वारकऱ्याच्या प्रेमाने उचंबळून आला आहे आणि त्याने धारण केलेले शब्दरूपही तेवढेच मोहक व डौलदार आहे.

## ६५ हाय हाय !

एकलकोंड्या, निष्प्रेम माणसाच्या मनात अनेक आकांक्षा स्फुरतात. सृष्टीतील सुंदरतेशी ओळखच व्हावीशी वाटते किंवा पार्थिव व्यवहारात जखमी झालेल्या जीवाला त्या अपार्थिव व्यवहारात सांत्वन शोधावेसे वाटते. पण स्वतःची शारीरिक जडता व दुर्बळताच प्रत्येक ठिकाणी आड येते.

## ६६ चेंडू

एका कल्पनेभोवती या कवितेची उभारणी आहे. ही कल्पना रम्य आहे यात शंका नाही. पण कविता काळजाला भिडत नाही, केवळ कल्पनाचमत्कृतीचा आनंद देते.

## ६७ लोकमान्यांस भारतवर्षाचा आशीर्वाद

## ६८ पानपतचा फटका

महाराष्ट्रगीताप्रमाणेच या दोन्ही कवितांतूनही गडकऱ्यांची दोन अभिमानस्थले

प्रगट झाली आहेत. लोकमान्यांवरील कविता उघडपणेच प्रासंगिक स्वरूपाची आहे. परंतु या घटनेच्या निमित्ताने भारतीय व मराठी इतिहासातील अनेक उज्ज्वल घटनांचे कवीला स्मरण होते आणि ती सारी पुण्याई या दिवसाच्या पाठीशी उभी आहे असे त्याला वाटते. लोकमान्यांचे विलायत प्रयाण ही त्या काळातील एक महत्त्वपूर्ण ऐतिहासिक घटना होती आणि गडकऱ्यांसारख्या भावशील कवीचे अंतःकरण तिच्यामुळे उचंबळून यावे हे साहजिकच होते. शेवटच्या भागातील शिवरायाच्या 'भवानी तलवारी'संबंधीचा उल्लेख लक्षात घेण्यासारखा आहे. 'भवानी तलवारी'ची स्फूर्ती देशाला इतर कशापेक्षाही अधिक तारक होईल असा विश्वास कवीला वाटतो.

पानिपतचे युद्ध हेही महाराष्ट्राच्या इतिहासातील एक तेजस्वी प्रकरण. पानिपतावर मराठ्यांचे शौर्य त्यागादि सर्वच गुण पणाला लागले. लढाईतच पराभव झाला पण या पराभवालाही अपूर्व पराक्रमाचे कोंदण मिळाले आहे. शाहिरी धाटणीने गडकऱ्यांनी या स्फूर्तिदायक युद्धातील विविध प्रसंगांचे वर्णन केले आहे. शेवटच्या कडव्यात देशाला उद्देशून प्रगट स्वरूपाचा संदेश आहे. कविता शाहिरी धर्तीची आहे हे लक्षात घेतल्यास तो अस्वाभाविक वाटणार नाही. गडकऱ्यांचे महाराष्ट्रप्रेम हे भारतप्रेमाशी व नव्या जाणिवांशी कसे जोडलेले होते हेही तेथे दिसून येते.

## ६९ कृष्णाकाठी कुंडल

एका संकल्पित कथाकाव्याचा हा त्रुटित भाग आहे. 'रायगडावर धनी आमुचा, त्याला विकली काया' असा अभिमान वाहणाऱ्या एका शिवकालीन शिपाईगड्याची ही प्रेमकहाणी शोकान्त आहे. कवितेची भाषा जुन्या बखरी स्वरूपाची आणि शैली विविध अलंकारांनी मोहरलेली आहे. राजसंन्यास हे नाटक ज्या मनस्थितीत गडकऱ्यांनी लिहिले तीच मनस्थिती 'कुंडला'तही दिसते. कवितेतील अनेक त्रुटित भाग स्वतंत्रपणानेही अतिशय काव्यमय व हृदयंगम वाटतात. दूरस्थ इतिहासकालातील प्रेमकथेला पोषक असे रंगमय, आल्हाददायक वातावरण सर्वत्र जाणवते. बालकवींची एक ऐतिहासिक प्रेमकथाही अशीच अपूर्ण आहे. केशवसुतात न आढळणारी ही इतिहास पुनराकार करण्याची वृत्ती पुढे पंधरावीस वर्षांनंतर मराठी काव्यात व वाङ्मयातही

प्रकर्षाने दिसून येते. त्या काळातील इतिहासभक्तीचा ( सर्वत्र दिसणाऱ्या ) हा एक परिणाम असावा.

## ७० विचार

## ७१ विराम-चिन्हे

या दोन्ही कविता कल्पकतेवर आधारलेल्या आणि कल्पनाचमत्कृतीचा आस्वाद देणाऱ्या आहेत. 'विचार' हा माणसाला मित्राप्रमाणे बिलगतो आणि शत्रूप्रमाणे छळतो. एकांतात गर्दी व गर्दीत एकांत निर्माण करतो. त्याची ही अनेकविध 'विचित्र लीला' कवितेत वर्णन केलेली आहे. ती मनोरंजक आहे यात शंका नाही. पण तेवढेच. 'विराम-चिन्हे' ही कविताही कल्पकताप्रधान असली तरी तिची हृदयंगमता अनेक पटींनी अधिक आहे. किंबहुना हे काव्य म्हणजे कल्पनाप्रधान काव्याचा मराठीतील एक उत्तमोत्तम नमुना आहे.

